


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

# दीपावली

मे १९६८

वर्ष २४ वें

मूल्य १॥ रु.



## भारतीय सेना विशेषांक

अनुक्रमणिका

# दीपावली

महाराष्ट्र दिन ● मे १९६८

**भारतीय सेना विशेषांक**

वर्ष २४ वे ● मूल्य १॥ रुपया

**श्रेयनामावलि—**

“**जनरल कुमारमंगलम**–आठ मिनिटांतील झलक–**सदानंद चेंदवणकर** ● **जया देव तारी**—लष्करी गडीही देवाला मानतात तर... **ब्रिगे. ल. वि. साठे** ● **हा अखंड नंदादीप**–सतत तेवतच ठेवावा लागणार...**ए. व्हा. मा. एस. एन. गोएल** ● **कदम कदम बढाये जा**–त्यासाठी डोंगर कपारी चढताना ऊर धपापतो...**पुरुषोत्तम वावकर** ● **छप्पर मैना**-मैना उनाड असते म्हणे पण....**मे. ज. बी. पी. वधेरा** ● **डंकर्कचे ‘दैव’ जाणिले कोणी?** जाणकारच अन्जान बनला होता... **धन्वंतरी**–डांस चिलटे यांचेही संवर्धन?–**मे. ज. करानी** ● **एकता–आज्ञांकिता**–नाही तर सारेच बेताल व्हायचे–**ब्रिगे. एम. एस. ओबेरॉय** ● **अतृप्ता**–पुरुषही नेभळट ठरतो अं..... **श्रीधर घैसास** ● **मराठ्यांचे स्वातंत्र्य युद्ध**–उगाच नाही ते पहाडी ‘चुव्हे’ बनले....**डॉ. भ. ग. कुंटे** ● **प्रीत पिऊनीया मीही रीती**—मज हवे ते गवसले ग–**निवेदक प्रभाकर अत्रे** ● **ऐलतीरी–पैलतीरी**–होडी लागली तर किनाऱ्याला...**कॅ. जी. एन. नामजोशी** ● **प्रगत झाला मानव**–पहिल्या वहिल्या शस्त्रांची ओळख...**श्री. र. पुरोहित** शिवाय रंगमंच, सन्मानपुष्पे, दीपमाला इत्यादी नेहमीची सदरे; ‘खाकी’ विनोद तसेच **वा. रा. सोनार** यांची ‘आईला हांक’ **आणि**

## ‘ऑर्डर्स ऑफ दि डे’

**राजकारणातील लष्करशाहीचे विनोदी दर्शन**

Gram: Dalalart
टे. नं. ३५७७६५

★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. यानी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु. + रजि. पोस्ट ६० पै. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीही अधिकृत मतें असतातच असे नाही. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.



अनुक्रमणिका

# शस्त्रेण रक्षिते राष्ट्रे शास्त्रविद्या प्रवर्तते





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART


● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्य शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात यते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ यथ छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ यथे प्रसिद्ध केले.


**आज महाराष्ट्र दिन!**

महाराष्ट्र हे एका नुसत्या प्रांताचे, काही एका विशिष्ट भू-भागाचे नाव नाही. महाराष्ट्र हे एका प्रवृत्तीचे, प्रकृतीचे नाव आहे. ती प्रवृत्ती आहे अन्यायाविरुद्ध ताठ मानेने उभे राहण्याची. ही प्रवृती ज्यांना समजली त्यांना महाराष्ट्र उमजला. महाराष्ट्राला नुसता भूगोल नाही. असा हा महाराष्ट्र कधीही संकुचित नव्हता आणि नाही. तसा तो असता तर मराठ्यांच्या सेना पानिपताकडे, अटकेकडे, पेशावरकडे झेपावल्या नसत्या. पानपतावरून लक्ष लक्ष बांगड्या फुटल्या नसत्या. सदाशिव-भक्तीचे घण दिल्लीच्या तक्ताला लागले नसते. महाराष्ट्राचा कुणी एक चाफेकर, वासुदेव बळवंत, सावरकर, टिळक, रानडे गोखले, फुले, लोकहितवादी – किती नावे सांगू ?– ही सारी माणसे ताठ मानेने उभी राहिली ती महाराष्ट्राची मान व शान ताठ राखण्यासाठी नाही. त्यांच्या श्वासात प्रगट होत होते अवघ्या भारताचे श्वसन. त्यांच्या ध्यासात होता अवघ्या भारताचा ध्यास. मनन मानमरातबाचे नव्हते. प्रसंगी बळी चढवूनही घडवायचा होता नवा भारत. स्वतंत्र, स्वयंपूर्ण, स्वायत्त, समर्थ भारत! म्हणूनच एखादा सेनापति बॉम्बविद्या शिकून येतो तर एखादे कविकृष्ण नेपाळात जाऊन टिळकांच्या इच्छेनुसार शस्त्रविद्या शिकून येतात. म्हणूनच एखादा सावरकर उठतो आणि साहित्यिकांना संदेश देतो, 'लेखण्या मोडा, बंदुका घ्या' आणि लाहोरच्या सीमेवर सैन्य खडे होताच हर्षभरित होतो आणि म्हणतो "ससांचे बहिरी ससाणे झाले. आता हे मृत्यो, ये. माझे स्वप्न साकारले आहे." युद्ध हा जगाचा जर अटळ असा धर्म असेल, तर प्रत्येक राष्ट्राचे शस्त्रसज्ज असणे हाही एक धर्मच आहे. ह्या द्वंद्वात्मक जगात युद्ध अटळ आहे. प्रत्येक लढाईचा शेवट हा नव्या युद्धाची नांदी ठरत आलेला आहे. मग ती नांदी शस्त्रांचा जयजयकार करीतच कां गाईली जाऊ नये? म्हणूनच शास्त्रीजी म्हणाले 'जय जवान, जय-किसान.' महाराष्ट्रात शेतेही पिकतात आणि शस्त्रेही पिकतात. महाराष्ट्राची शस्त्रे चालतात तीही परक्यांविरुद्ध. काश्मीर, लडाख, नेफामध्ये हीच आव्हाने जेव्हा भारताला मिळाली तेव्हा लढलेल्या सेनेत शिवरायांचे मावळे-मराठे होते, ह्याचा अवघ्या महाराष्ट्राला अभिमान वाटतो. 'महाराष्ट्र' हा खऱ्या खुऱ्या अर्थाने भारताचा खड्गहस्त व्हावा म्हणून इथे सैनिकी परंपरा कायम राहिल्या पाहिजेत. वाढल्या पाहिजेत. साहसे श्रीः प्रतिवसति असे म्हणतात. हे साहस इथे रुजावे, वाढावे व दरिद्री महाराष्ट्र खराखुरा 'श्री'मंत व्हावा म्हणून महाराष्ट्र दिनाचे निमित्ताने तो करण्यात एक औचित्य वाटले म्हणून मुद्दाम जाणीवपूर्वक केलेला अल्पसा प्रयत्न.

तथापि दोन गोष्टींचा उल्लेख करणे अपरिहार्य वाटते १९६७ च्या नौदल विशेषांकासाठी तसेच याही अंकासाठी राष्ट्रपती व संरक्षण मंत्र्यांनी संदेश पाठवावेत अशी आवर्जून विनंती करण्यात आली होती. परंतु १९६७ साली डॉक्टर राधाकृष्णन् व यंदा डॉ. झाकीर हुसेन यांच्या टेबलावर आमचे ते पत्र बहुधा गेलेलेच नसावे!!! दोन्ही प्रसंगी त्यांच्या सेक्रेटेरीएटने परस्पर वाटाण्याच्या अक्षता लावल्या. सरदार स्वर्णसिंग तर आपले संरक्षण मंत्री! त्यांचा हा खास प्रांत–परंतु त्यानाही या उपक्रमाची माहिती मिळाली नसावी. फार काय त्यांच्या सेक्रेटरीएटकडून नकाराचेसुद्धा पत्र येऊ नये याबद्दल खंत वाटते, लाज वाटते....

त्या दोन्ही अंकांचे वेळी साहित्य मिळवून देण्यात संरक्षण खात्याच्या जनतासंपर्क विभागाचे बहुमोल मदत केली. परंतु या अंकाची सजावट मात्र इच्छा असूनही रंगविणे जमले नाही. नौदलाची एक मुख्य कचेरी मुंबईलाच असल्याने, त्या अंकासाठी आम्हाला इष्ट वाटलेली सारी छायाचित्रे व सर्व ठसे मिळू शकले. परंतु यावेळी मात्र तसे सहकार्य लाभू शकले नाही. कारण प्रत्येक वेळी तपशीलवार माहिती पुरवूनही सर्व साहित्य वेळेवर मिळतेच असे नाही. कारण सर्व सूत्रे दिल्लीहून हलतात. आणि त्या सव्यापसव्यात जो वेळ जातो, त्यामुळे मासिकाच्या दैनंदिन कामाचे व छपाईचे वेळापत्रकच उलट सुलट होऊन जाते. असा आहे दिल्लीचा कारभार. पण सरकारी नोकराना तरी कसा ठपका द्यावा? कारण यथा राजा तथा प्रजा....

तरीही हे राष्ट्र आमचे आहे. आम्ही या राष्ट्राची लेकरे आहोत. म्हणूनच आमच्या कुवतीनुसार जे जमले ते मांडले. त्यांतील उणीवांची आम्हालाही जाणीव आहे. सुदाम्याचे हे पोहे गोड करून घेतले जावेत, हीच विनंती.

–संपादक






# क्रांतीपेक्षा उत्क्रांतीवर विश्वास ठेवणारे भारतीय लष्कर प्रमुख जनरल कुमारमंगलम्






**नागरी** वेषातील अनोळखी व्यक्तींना आणि विशेषतः पत्रकाराना भेटण्यावाबत त्यांच्याशी चार शब्द बोलण्यावावत जनरल परमशिव प्रभाकर कुमारमंगलम् हे अतिशय लाजाळू आहेत आणि ते अत्यंत अबोल आहेत असा इषारा अर्थात्च सद्भावनेने मला अनेकानी दिला होता. वलाढ्य नि अबोल माणूस मी स्वत:शीच म्हटले. "होय". पण त्यांची भेट होताच त्यांचे स्मित गुंतवून ठेवणारे होत आणि त्यांनी केलेल्या हस्तांदोलनात विश्वासाची उब होती.

जनरल चौधरी हे भारताच्या लष्कर प्रमुख पदावरून सेवानिवृत्त झाले व त्या पदावर जनरल कुमारमंगलम् यांची नियुक्ति झाली तो काळ अस्वस्थतेचा नि अशांततेचा होता. त्या जमान्यात देशातल्या सर्वोच्च संरक्षणाधिकाऱ्याने 'उपद्रवी' आणि 'छिद्रान्वेषी' पत्रकारापासून हाताच्या अंतरावर राहावे हे स्वाभाविकच म्हणायला हवे. पण एकदा का मनातील संदेहाचे निराकरण झाल्यावर मात्र कुमारमंगलम् यांच्या एवढा आतिथ्यशील माणूस दुसरा सापडणार नाही. सहा फुटावर उंची आणि भक्कम बांधा असे कुमारमंगलम् आपल्या पुढे उभे राहिले म्हणजे आपण केवळ दडपूनच जातो असे नव्हे तर त्यांच्या रुंद खांद्यावर व छातीवर झळकणारी अधिकारपदाची सन्मानचिन्हे आणि फितीचा समूह पाहिल्यावर आपण तोंडात आश्चर्यानं बोटही घालतो. पण ते जेव्हा समोर येऊन बसतात तेव्हा मात्र एकदम चमत्कार व्हावा तसा फरक पडतो. सावधपणा व रुबाब कायम असतो पण त्यांच्या व्यक्तित्वातील माणूसपण त्यातून झळकते.

जनरल कुमारमंगलम् यांची आदर्श लष्करी नेत्याबद्दलची कल्पना अत्यंत साधी पण स्फूर्तिदायक अशीच आहे. लिबियात दोस्त राष्ट्राना पहिल्यांदाच जय मिळवून देणारे फिल्ड मार्शल वेव्हेल यांच्या शब्दात ते मला म्हणाले, "खरा सेनाप्रमुख तोच की जो अत्यंत आणीबाणीच्या वेळीही शांत आणि संयमशील राहतो." त्यातच जनरल कुमारमंगलम् यांनी पुढील गोष्टींची भर घातली. खरा जनरल नि:पक्षपाती व न्यायी हवा. धर्म, जात व वर्ण यामुळे त्याच्या मनात अजिवात किल्मिष आलेले नसावे आणि दुसरी गोष्ट म्हणजे आपल्या उद्दिष्टाबद्दल त्याला पूर्णपणे तळमळ हवी. आणि ती पार पाडण्याला लागणारे मनोधैर्य व मानसिक अविचलीतपण हवे. याच्याच जोडीला श्रेष्ठ दर्जाची बुद्धीमत्ता असेल तर फारच चांगले. पण या गुणांच्या गैरहजेरीत तिचा फारसा उपयोग होण्यासारखा नसतो.

मजबरोबर बोलता बोलता लष्कर प्रमुख आपल्या भूतकाळाकडे वळले. आपल्या आजोबांचा आपल्यावर आपल्या पंधराव्या वर्षापर्यंत फार मोठा प्रभाव पडला असे ते म्हणाले. के. रंगराव हे त्यांचे नाव. आपल्या आयुष्याच्या सरत्या काळात ते स्वामी ईश्वरानंद म्हणून ओळखले जात असत. त्यांनी त्यावेळी मंगलोरमध्ये मागासलेल्या व अस्पृश्य लोकांच्या उन्नतीसाठी चळवळ आरंभिली होती. पहिल्या महायुद्धाच्या काळात किशोर परमशिवांचे आईवडिल परदेशात होते त्यामुळे त्यांना आपल्या आजोबांबरोबरच रहावे लागले. जातिभेदाबद्दल घृणा, तिरस्कार, सहिष्णुता आणि स्वार्थत्यागाची भावना, विश्वबंधुत्वाची जाणीव, निर्लिप्तपणे विचार करण्याची शक्ती आणि संकटकाळीही धैर्य राखून अखेरपर्यंत लढा देण्याची वृत्ति या सगळ्या गोष्टी त्यांच्या रक्तात भिनल्या त्या याच काळात.

याच प्रभावामुळे की काय कुणास ठाऊक आपला धाकटा भाऊ मोहन आणि बहीण ही दोघे कम्युनिस्ट विचाराची बनली असावीत असा त्यांचा अंदाज आहे. परंतु आपला मात्र क्रांतीपेक्षा उत्क्रांतीवादावर अधिक विश्वास असल्याने आपण पत्करलेला मार्ग कमी खडतर ठरला. तात्विक मतभेद थोडे जरी असले तरी कुटुंबातील सर्वांचे संबंध घनिष्ठच होते याचे कारण आपल्या आईवडिलांनी स्वामी ईश्वरानंदाचीच शिकवण अक्षरश: आचरणात आणली होती.

आपल्या वडिलांच्या विशाल मनाची एक आठवण सांगताना कुमारमंगलम् म्हणाले, ईटन येथील शिक्षण संपवून बूलविचला लष्करी शिक्षणासाठी जाण्याची त्यांची खूप इच्छा होती पण त्यांचे वडील कॉंग्रेस पक्षाचे होते आणि कायदेभंगाच्या चळवळीत भाग घेत असत. तरीही तरुण परमशिवाच्या महत्वाकांक्षेच्या आड ते आले नाहीत. लष्कर हे त्यावेळी ब्रिटिशांच्या साम्राज्यशाहीचे एक हत्यार असले तरी लष्करी शिक्षण घेण्याचा हक्क भारतीय मुलाना आहे असे त्यांचे मत होते नाहीतर स्वातंत्र्य प्राप्तीनंतर भारताच्या लष्कराची सूत्रे हाती घेण्यास कर्तव-

अनुक्रमणिका

गार लष्करी अधिकारी मिळणार तरी कुठून असे ते वारंवार बोलून दाखवित.

२९ ऑगस्ट १९३३ रोजी वयाच्या अवघ्या विसाव्या वर्षी कुमारमंगलम् वूलविच येथून पदवी घेऊन तोफखान्याच्या तुकडीत दाखल झाले. दुसऱ्या महायुद्धात लिबियामध्ये ते प्रत्यक्ष समरांगणावर होते. १९४२ सालच्या लिबियातील मोहिमेत तिसऱ्या भारतीय मोटर ब्रिगेडचे ते मेजर म्हणून काम करीत होते. त्यावेळी त्यांनी दाखविलेल्या शौर्याबद्दल त्यांना 'डिस्टिंग्विशड् सर्विस ऑर्डर' मिळाली होती. त्याच वर्षी मात्र त्यांना युद्धकैदी म्हणून पकडून एका छावणीत पाठविण्यात आले होते.

काही काळपर्यंत त्यांना वाटले की जग कोसळून पडले आहे आणि आपल्या साऱ्या साऱ्या आशा आकांक्षाचा चक्काचूर होऊन गेला आहे. पण आपल्यावर निराशेचा पगडा मात्र त्यांनी बसू दिला नाही. युद्धकैद्यांची छावणी देखील रणांगणाप्रमाणेच नेतृत्वाचे शिक्षण देऊ शकेल अशी त्यांची खात्री पटली. शत्रूच्या हातावर तुरी देऊन ते निसटले व इटलीभर काही काळ स्वैर भटक भटक भटकले. पण तेवढ्यात त्यांना नाझींनी पुन्हा पकडले, व जर्मनीत कारावासात डांबले. जर्मनीतल्या त्या कारावासातले जीवन तर अधिकच खडतर होते. तिथे असलेल्या युरोपमधील इतर कैद्यांशी त्यांच्या ज्या चर्चा झाल्या त्यामुळे त्यांना खूप नवे ज्ञान मिळाले.

युद्ध संपल्यावर मेजर कुमारमंगलम् भारतात परतले. आरंभी त नवव्या हेवी ॲंटीएअर क्राफ्ट तुकडीचे प्रमुख होते. नंतर बाराव्या पॅराशूट फील्ड तुकडीचे. स्वातंत्र्यानंतर १९४८ साली ते ब्रिगेडियर बनले आणि देवळालीच्या आर्टीलरी स्कूलचे कमांडंट म्हणून त्यांची नियुक्ती झाली. येथून त्यांच्या वढत्या द्रुतगतीने होत गेल्या. १९५० साली ते आर्टीलरीचे डायरेक्टर झाले. पण या साऱ्या बढत्यांकडे जनरल कुमारमंगलम् काहीशा वैफल्याच्याच भावनेने पाहातात. कारण जम्मू-काश्मीरमध्ये त्यांना प्रत्यक्ष युद्धावर पाठविण्यात आले नव्हते. किंवा १९६२ साली चीनविरुद्ध झालेल्या संग्रामातही ते आघाडीवर जाऊ शकले नव्हते. भारत-पाक संघर्षातही भाग घेण्याची संधी त्यांना देण्यात आली नव्हती. परंतु १९५६-५७ साली जम्मू-काश्मीरमध्ये सैन्याच्या हालचालीबद्दल त्यांनी जी योजना आखली त्याबद्दल मात्र त्यांना अतिशय अभिमान वाटतो. लेफ्टनंट जनरल म्हणून नेमणूक झाल्यावर त्यांनी नेफामधील लढाईने शिकवलेल्या धड्याचा कसून अभ्यास केला. त्यानंतर मात्र त्यांना शिखराचा मार्ग स्वच्छच होता. नव्हेंबर १९६४ मध्ये डेप्युटी चीफ ऑफ दी आर्मी स्टाफ आणि काही महिन्यानी व्हाइस चीफ झाल्यावर त्यांचे सर्वोच्च पद काही दूर नव्हते.

जनरल कुमारमंगलम् यांच्या शरीरातला रक्ताचा कणन् कण सैनिकी बाण्याने भरलेला आहे. त्यांची देशप्रीति आणि निष्ठा यांना मर्यादा नाही. राजकारण खेळणे हा त्यांचा धंदा नव्हे पण तरीही कै. लालबहादूर शास्त्री यांच्याबद्दल त्यांना वाटणारी आत्मीयता भक्तीभावानजिक जाऊन पोहोचते. ताश्कंदला शास्त्रीजी जेव्हा गेले होते तेव्हा त्यांच्या बरोबर ते होते. पाकिस्तानवर हल्ला चढवा या हुकूमावर स्वाक्षरी करायला हिम्मत लागते पण त्यापेक्षाही अस्सल दर्जाची निर्भरता शांततेच्या करारावर सही करताना लागते असे ते म्हणतात. इंदिरा गांधींच्या नेतृत्वाबद्दलही त्यांना आदर वाटत असतो, आणि गृहमंत्री यशवंतराव चव्हाण यांच्याबद्दलही त्यांना मोठे प्रेम वाटत असते. प्रत्येक लष्करी अधिकाऱ्याला त्यांच्याबद्दल लोभ वाटतो. कारण त्यांच्या सगळ्या अडी-अडचणीबद्दल त्यांना सहानुभूति वाटते. त्यांच्या आकांक्षाशी ते समरस होतात आणि त्यांच्या शौर्याबद्दल ते पूर्णपणे विश्वास बाळगतात.

एकेकाळी जनरल कुमारमंगलम्‌जी उत्तम प्रकारे पोलो खेळत असत. ते घोडदौडही उत्तम करीत. मेरीलीबोर्न क्रिकेट क्लबचे ते अजूनही सदस्य आहेत. रायफल हॉर्टीकल्चर सोसायटीचे ते फेलो आहेत. इतिहासाची पुस्तके चाळण्याची त्यांना भारी आवड आहे. पण आज आपल्या सर्व छंदांचा पाठपुरावा करायला त्यांना कार्यबाहुल्यामुळे तितकासा वेळ मिळत नाही. मात्र शारीरिक दृष्टचा निकोप राहण्याबाबत ते कधीही हेळसांड करीत नसतात. आपल्या निकोपाच्या हस्तांदोलनात ते जणू आपल्या नसानसात सामर्थ्य आणि आत्मविश्वासच संक्रमीत करीत आहेत असेच मला वाटते. त्यांच्याशी झालेल्या मुलाखतीत सगळचा भयशंकांचा निरास झालेला होता आणि आपल्या मायभूमीची एकात्मता व स्वातंत्र्य अभंग राहील याचीच ग्वाही मिळालेली होती.

—सदानंद चंदवणकर

• • •

**क्षमस्व**

ऐनवेळी उद्भवलेल्या काही अडचणींमुळे ब्रिगे. निजानंद बाळ यांचे साहित्य तसेच भारतीय तोफखान्यावर आधारीत युद्धकथा या अंकात प्रसिद्ध करणे केवळ अशक्य झाले. त्या अपेक्षाभंगाचे दुःख आपल्याइतकेच आम्हालाही होत आहे. तो मजकूर ऑगस्टच्या अंकात प्रसिद्ध करीत आहोत.












गृहमंत्री भारत
नई दिल्ली

७ मार्च १९६८

स्वातंत्र्य प्राप्तिनंतर भारतावर त्याच्या शेजाऱ्यांकडून चार आक्रमणें झाली आणि त्याला आम्हीं धैर्याने व यशस्वीरितीने तोंड दिले. आपल्या भूमीचे व स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी प्रत्येक देशास सदैव जागरुक राहिले पाहिजे. आमच्या शेजारी देशांच्या वागणुकीमुळे व त्यांची सैनिक तयारी पहातां परकीय आक्रमणाचा धोका नजीकच्या काळांत टळला आहे अशी आशा करणें चुकीचे ठरेल. म्हणूनच संरक्षणाची व तद्विषयक समस्यांची माहिती सर्व नागरिकांना देऊन त्यांच्यात जागरुकता व परकीय चक्रांना आत्मविश्वासाने तोंड देण्याचे सामर्थ्य निर्माण केले पाहिजे.

'दीपावली'चा सेना विशेषांक या दृष्टीने उपयोगी सिद्ध होईल अशी मला आशा आहे.

माझ्या शुभेच्छा

यशवंतराव चव्हाण

---



DO No. 70015/1/COAS

CHIEF OF THE ARMY STAFF
ARMY HEADQUARTERS
NEW DELHI
19 March 1968.

General P. P. Kumaramangalam, D.S.O.

Dear Shri Dalal,

I am glad that the magazine "Dipavali" is bringing out an Army Special Issue. We always are grateful when we get appreciation from any part of India for the work we do. We are truly an All India organisation which does not differentiate between one class and another nor one region from another. Our main task is to serve the country whether in peace or war and help her to become great as she deserves it. I wish you success in your publication of an Army Special Issue in May this year.

*Gen. Kumaramangalam*

---





Deputy Information Adviser to the Prime Minister

PRIME MINISTER'S SECRETARIAT.
NEW DELHI-11.

March 8, 1968

F. 14/11/68 PMP

Dear Sir,

The Prime Minister thanks you for your letter and sends her best wishes for the success of the Army Special Issue of the 'Dipavali' being brought out in May, 1968.

Yours faithfully
H. Y. Sharada Prasad

---



NAVAL HEADQUARTERS,
NEW DELHI-11.

ADMIRAL A. K. CHATTERJI
CHIEF OF THE NAVAL STAFF

16th March, 1968.

I am very glad to know that 'Dipavali' magazine is bringing out its May 1968 issue as a 'Special Army Issue'. I am sure that this issue of 'Dipavali' will be very instructive and beneficial to all its readers.

I wish the publishers of the magazine 'Dipavali' every success.

*A. K. CHATTERJI*
ADMIRAL.



अनुक्रमणिका










# रक्षादेवतांनो

ब्रिगेडियर वि. ल. साठे

*आंवढा गिळून "You made it Willie" असे म्हणतो न म्हणतो तोच स्फोट झाला. आम्ही दोघांनीही डोळे मिटून घेतले....*

**मी** लष्करी सिलेक्शन बोर्डमध्ये दोन–तीन वर्षे प्रेसिडेंटच्या पदावर होतो. त्या दिवसात होतकरू मुलाना इंटरव्ह्यूत "तुला सैन्यात कां जाण्याची इच्छा आहे" असा कधी कधी प्रश्न विचारीत असे. या माझ्या प्रश्नाला नानाविध उत्तरे मिळत असत: "माझी प्रेयसी (Girl Friend) आग्रह करते आहे म्हणून " पासून "मला लष्करी जीवनाची आवड आहे म्हणून" पर्यंत. बहुतेक मुले उत्तर देत "मी, देशासाठी प्राण द्यायला तयार आहे म्हणून." साधारणपणे त्या दिवसात असाच अनुभव आला की सर्वसाधारण मुलाना लष्करी अधिकाऱ्यांच्या जीवनाची, त्यांना काम काय असतं, त्यांची राहणी कशी असते, काय कमी अधिक कष्ट त्यांना सोसावे लागतात, त्यांच्या मुलाबाळांचं पालन, शिक्षण, गृहसौख्य या बाबतीत काय परिस्थिति असते, वगैरेंची फारच अंधुक कल्पना असते ! किंबहुना या सर्वाची त्या मुलांना जाणीवच नसते असं म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. तेव्हा लष्करी जीवनातील काही अनुभव देत आहे त्यावरून लष्करी अधिकारी होऊ इच्छिणाऱ्या युवकाना काहीशी मदत होईल व इतराना 'युद्धस्य कथा रम्या'च्या न्यायाने करमणूक तरी होईल. माझे अनुभव सैन्यातील जीवनाचे व त्यातल्या त्यात पायदळातील अधिकाऱ्याचे आहेत. नौ-सेना व नभसेना यातील अधिकाऱ्यांचे अनुभव अर्थातच काहीसे वेगळे असणार.

नुकतेच कमिशन मिळून नसीराबादला गोऱ्या पलटणीत माझी एका वर्षाच्या attachment साठी नेमणूक झाली होती. मिलिटरी अॅकॅडमीतील प्रशिक्षण संपल्यावर त्या काळी आम्हा सर्व भारतीय ऑफिसर्सना एक वर्ष गोऱ्या पलटणीत काढावे लागे. मी ज्या गोऱ्या पलटणीत गेलो ती नव्यानेच हिंदुस्थानात आलेली होती. "टॉमी"वर प्लटून कमांडर म्हणून अधिकार चालवायचा, बरोबरीचे व वरीष्ठ सर्वच अधिकारी इंग्रज त्यांच्या बरोबर रहायचे, काम करायचे, खेळायचे (हॉकी, टेनिस, क्रिकेट वगैरे) या सर्वाचे मला व माझ्याबरोबरच नेमणूक झालेल्या अर्जुन पाळंदेला जितके कुतूहल होते, तितकेच किंबहुना काहीसे अधिकच त्या सर्वांना पण आम्हा हिंदी ऑफिसर्सबद्दल होते.

मला त्या पलटणीत जाऊन तीन चार महिने झाले होते, व आता डिसेंबरचा महिना उजाडून चांगलीच थंडी पडू

लागली होती. एक दिवस संध्याकाळी एका इंग्रजी ऑफिसरची पत्नी मला म्हणाली, "बापरे किती गारठा आहे आज, अन् आम्हाला शाळेत शिकवलं जातं की हिंदुस्थान गरम देश आहे!" मी हसून तिला म्हणालो, "ही थंडी तरी तितकीशी नाही. काश्मीर भागात व सिमला, मसूरीला तर बर्फ पडतं!" बरोबर हेच उद्गार ११-१२ वर्षांनंतर एका इंग्रज ऑफिसरने दिल्लीला माझ्या पत्नीजवळ काढलेन्. भारताविषयीच सर्वसाधारण इंग्रजांचं ज्ञान (?) यावरून कळून येईल.

## थँक गॉड, विठ्ठल-तू आहेस तर!

नोव्हेंबर १९४० ची गोष्ट. मी त्यावेळी मराठा लाइट इन्फन्ट्रीच्या एका पलटणीत होतो. हिंदुस्थानच्या त्यावेळच्या नॉर्थवेस्ट फ्रंटियर प्रॉव्हिन्समध्ये आम्ही होतो. एका जागेहून दुसऱ्या ठिकाणी रसद पोचवली जात होती व ती नेणाऱ्यांचं पठाणांच्या झडपेपासून रक्षण करण्याची कामगिरी माझ्या पलटणीवर होती. रसद नेणारी तुकडी एका नाल्यातून पायवाटेने चालली होती व माझ्या पलटणीच्या तुकड्या नाल्याच्या दोहोबाजूस असलेल्या उंच डोंगरावर मोक्याच्या टेकड्या (पिकेट्स) धरून बसलेल्या होत्या. जस जसे नाल्यातील लोक पुढे जात, तस तसे त्यांना समांतर असलेले डावी उजवीकडचे आम्ही लोक डोंगरावरून खाली उतरून, रसद नेणाऱ्यांच्या मागोमाग येणाऱ्या आपापल्या पलटणीत सामील होत होतो. एकदा खाली उतरून आल्यावर पुढे जाताना परत जरूरी पडली की फिरून आमच्या तुकड्या डावी उजवीकडील डोंगरावर चढून ठाणी (पिकेट्स्) अडवीत असत.

अशा तऱ्हेने रसद नेणारी खेचरे व त्यांच्याबरोबरचे सैनिक दिवसभर पुढे सरकत होते. मी स्वतः माझ्या कंपनीसकट तीन वेळा निरनिराळ्या डोंगरांवर चढून काम पार पाडलं होतं. संध्याकाळचे ४-४। वाजले होते व आता डोंगर उतरून खाली नाल्यांत गेलो की कँप गाठायचा, निदान दुसरा दिवस उजाडून मजल पुढे हालेपर्यंत तरी परत डोंगर चढायला लागणार नाही म्हणून व थंड झालेल्या सुक्या चपातींवर सारा दिवस काढल्यानंतर कँपमध्ये संध्याकाळचं जेवण तरी गरम मिळेल या आशेने आम्ही सर्व आनंदात होतो, आणि खाली उतरायला मिळणाऱ्या इशाऱ्याची उत्सुकतेनं वाट पाहत होतो.

पिकेट सोडून यायची ही वेळ धोक्याचीच असते. कारण सर्व शिपायांचं लक्ष जलद्गतीने पळत पळत खाली उतरण्यात वेधलेलं असे व पठाण नेमके ही संधि साधून आमच्यावर गोळ्यांचा मारा करीत. अशा प्रसंगी जर कोणी शिपाई जखमी झाला अगर दुर्दैवाने कामी आला तर त्याला उचलून खाली न्यावे लागे. कधी कधी पिकेटवरचे इतर लोक पूर्ण डोंगर उतरून खाली नाल्यात पोंचल्यावर मोजणी करताना एखादा शिपाई जखमी होऊन वरच राहिल्याचं ध्यानात येई. अशा प्रसंगी त्या कंपनीला परत डोंगर चढून जावे लागे व जखमी माणसाला शोधून खाली घेऊन यावे लागे, भलेही मग ते सर्व लोक कितीही दमले भागलेले असोत, वा दिवसभराचे उपाशी असोत. पण जखमी सवंगड्याला मागेच सोडून येणं हा एक भयंकर मोठा गुन्हा —नव्हे पातकच गणलं जातं. अर्थात् असं परतून वर चढावं लागलं तर अधिक सर्वांनाच धोका असायचा कारण त्या थकलेल्या लोकांना वर चढून जखमी माणसाला खाली नेता येऊ नये यासाठी पठाण आपल्या परीने पराकाष्ठा करायचे व गोळ्यांचा भडिमार करायचे. जखमी शिपायाला कैद करून पठाणाना न्यायची बिलकुल इच्छा नसायची. एखादे वेळी चुकून असा कोणी दुर्दैवी त्यांच्या तावडीत सापडलाच तर त्याची खांडोळीच उडत असत. पण पठाणांना हाव असायची त्या जखमी शिपायाच्या बंदुकीची व काडतुसांची! त्यांच्या विचारसरणीप्रमाणे रायफल हाती लागत असेल तर ते त्यासाठी स्वतःचे प्राण देखील धोक्यात घालायला कचरायचे नाहीत.

अखेर त्या संध्याकाळी खाली उतरा-



**मुख्यमंत्री**
सचिवालय, मुंबई-३२.
१६-४-१९६८

**स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी देशाभिमानी तरुणांनी लष्करात मोठ्या प्रमाणावर भरती होण्याची अत्यंत आवश्यकता आहे. महाराष्ट्राची लष्करी परंपरा उज्ज्वल आहे पण भारतीय संरक्षण दलात मराठी माणसे अगदी कमी आहेत. तेव्हा, महाराष्ट्रातील तरुण वर्ग लष्करी पेशाकडे आकृष्ट होऊन, तो मोठ्या संख्येत भरती होईल यादृष्टीने व्यापक प्रयत्न करण्याची गरज आहे. महाराष्ट्रातील प्राचीन लष्करी परंपरेचे जतन करण्याची व भारताच्या संरक्षण कार्यात यथोचित वाटा उचलण्याची प्रेरणा या खास अंकामुळे महाराष्ट्रातील तरुण वर्गामध्यें निर्माण झाल्यास ते या अंकाचे यशच ठरेल.**

**आपल्या उपक्रमाचे मी स्वागत करुन, आपल्या अंकास सुयश चिंतितो.**

**—वसंतराव नाईक**

यचा इशारा मिळाला व माझ्या कंपनीतील शिपाई माझ्या हाताच्या इशाऱ्याकडे टक लावून बसले. आम्ही नाल्याच्या उजवीकडील डोंगरावर होतो व नाल्यापलिकडच्या डोंगरावर एका गोऱ्या पलटणीतील एक कंपनी होती. मी इशारा दिला व आम्ही सर्व निघालो. पठाणानी फैर झोडून





अनुक्रमणिका

सलामी दिली. सुदैवाने कोणालाही धक्का न लागता आम्ही सर्व खाली पोचलो. सुभेदार साहेबानी मोजणी करून शिपाई, हत्यारे सर्व ठीक ठाक खाली आल्याची वर्दी मला दिली व मी ॲडज्युटंटकडे कंपनी सुरक्षित खाली आल्याचा रिपोर्ट द्यायला गेलो. मी त्याला रिपोर्ट देत असतानाच नाल्याच्या डाव्या बाजूस पठाणांच्या गोळयांच्या जोरदार भडीमाराचा आवाज झाला.

ॲडज्युटंट जवळच माझा कमांडिंग ऑफिसरपण उभा होता तो "Well done B Company" मला उद्देशून म्हणाला. डावीकडील डोंगराकडे तोंड फिरवून पुढे म्हणाला" "Poor Ronny (गोऱ्या पलटणीचा कर्नल), he is having a tough time I hope his lads come down safely and son." आम्ही तिघेही इंग्रज पलटणीच्या पिकेटच्या दिशेने पाहू लागलो. डोंगराचा सर्वच भाग दिसत नव्हता, पण काही गोरे शिपाई पळत डोंगर उतरताना दिसत होते. पठाणांच्या गोळयांचे आवाज येतच होते, व कमी होता होता ४–५ मिनिटानी थांबले पण. म्हणजे माझ्याप्रमाणेच ती इंग्रज शिपायांची कंपनीपण डोंगरावरून उतरून खाली नाल्यात आली असावी. आता लवकरच पुढे कूच करून कँप गाठायचा हुकूम मिळेल याच आनंदात मी होतो.

इतक्यात परत बंदुकीचे वार होऊ लागले व वराच कल्लोळ उठला. त्या ब्रिटिश कंपनीतला कोणी तरी उतरताना डोंगरावर जखमी होऊन पडला असावा व ती कंपनी त्याला शोधून खाली आणण्यासाठी डोंगरावर परतत असावी असा मी तर्क बांधला. सबंध दिवसांच्या श्रमानंतर फिरून पिकेटवर जायचं याबद्दल त्या गोऱ्या सैनिकांबद्दल मला हळहळ वाटली, पण त्यांचा पिकेट फिरून काबीज करायचा प्रयत्न दिसेल तितका पहायला मी तिथेच थबकलो. गोरे सैनिक पिकेटची टेकडी अर्धीअधिक झपाटयाने चढून गेले असतील नसतील तोच त्यांचा वेग मंदावला. गोळीबार चालूच होता. आणखी १०–१२ मिनिटात त्यांना पुढे जाताच येईना व माझ्या मनात विचार आला "ही कंपनी जर पिकेटवर ताबा करू शकली नाही तर आणखी एका कंपनीला मदतीला जावे लागेल. आता संध्याकाळ होऊ घातली आहे. जर दुसऱ्या कंपनीला वर जावंच लागलं तर दोन्हीही कंपन्यांना रात्र कँपऐवजी या डोंगरावरच काढावी लागेल. म्हणजे रात्री सुखाने झोप काढायला मिळण्याऐवजी या लोकाना रात्रभर डोळयात तेल घालून रहावं लागेल. कारण रात्री त्यांच्या भंवती पठाणांचे कोंडाळं पडेल व कोणत्या वेळी, कोणत्या बाजूने, किती पठाण कसे हल्ला करतील याचा नेम नाही."

"विठ्ठल, तू इथेच आहेस, नशीबाचीच कृपा (थँक गॉड)" माझ्या कर्नलच्या शब्दांनी मी भानावर आलो. तो पुढे म्हणाला, "संध्याकाळ दूर नाही व जॉनची (माझ्याच पलटणीतला आणखी एक कंपनी कमांडर) कंपनी फार मागे आहे. ती ब्रिटिश कंपनी पिकेटच्या अर्ध्यावर अडकून पडली आहे. पठाणांच्या तीन बाजूंच्या गोळीबाराने त्या कंपनीतल्या लोकाना कोणत्याच प्रकारची हालचाल करता येत नाही. तरी मदतीला आपली एक कंपनी पाठवायची आहे. तू आपली कंपनी घेऊन जा. माझ्यामते या डावीकडील पहाडीवर तू चढून गेलास तर पठाणांना त्यांच्या मागील बाजूस शह बसेल, मागे हटावे लागेल. या समोरच्या नाल्याच्या वळणाआडून तुला पहाडीवर चढायची सुरुवात करायला सोपं जाईल. तिथून अशा तऱ्हेने (जमिनीवर दाखवून) वर चढलात तर तुम्ही पठाणांच्या माऱ्याच्या टापूबाहेर रहाल व तुम्हा सर्वांना लपून छपून वर जाता येईल. कंपनी घेऊन लवकर नीघ," नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे ऑर्डर्स दिल्यावर त्याने मला "काही शंका अगर प्रश्न (any questions)" असे विचारलेन. मी नाही म्हणून उत्तर दिल्यावर माझ्या खांद्यावर हात ठेवीत म्हणाला. "मला माहीत आहे तुम्ही फार दमलेले आहात दिवसभराच्या मेहनतीने. पण माझी खात्री आहे की तुझी कंपनी त्या ब्रिटिश कंपनीला वांचविल. Good luck and God be with you"

[पृष्ठ ६५ वर पहा]

ऑर्डर्स ऑफ द डे



यशस्वी माघार

अनुक्रमणिका



# हा अखंड नंदादीप

एअर व्हाईस मार्शल एस. एन. गोएल

दोन हृदये एकत्रित आली तर पहाडांचाही चुराडा होईल, असे छत्रपती शिवाजी महाराजांनी मिर्झा राजा जयसिंहाला कळविले होते. ती मने एकत्रित आणण्यासाठी, राष्ट्रनिष्ठेचा नंदादीप तेवता ठेवण्यासाठी काय करावे लागते? काय केले जाते?



...विधळ्या उडवीन...राई राई एवढ्या...

**आपली नॅशनल डिफेन्स आकादमी** ही साऱ्या जगातील एक वैशिष्ट्यपूर्ण संस्था असल्याचे सांगताना मला फार आनंद वाटतो. तीन्ही दलांसाठी लागणाऱ्या भावी अधिकाऱ्यांना एकत्रित शिक्षण देणे हे आमचे पहिले वैशिष्ट्य आहे. कारण हल्लीच्या युगात लष्कर, नौदल व वायुदलातील अधिकाऱ्यांना त्या तीन्ही दलांची रचना, (स्ट्रक्चर) तसेच नियम वगैरे माहीत असणे, दोन दृष्टींनी जरुरी आहे. पहिली गोष्ट अशी की अलीकडच्या कालातील सशस्त्र मोहीम ही आता एकाद्या विशिष्ट दलाची मिरासदारी राहिलेली नसून, त्या त्रिशुळानेच शत्रुचा नाश करावयाचा असतो. दुसरे असे की वरिष्ठ पातळीवर (स्टाफ व कमांड ग्रेड) चटकन् एकादे वेळी तशी गरज निर्माण झाल्यास तिन्ही दलातील कोणताही स्टाफ-ऑफिसर किंवा कमांडर अन्य दलाचीही योजना हातात घेऊन ती पार पाडू शकतो. आणि तिसरी व अधिक महत्त्वाची गोष्ट अशी की देशाचे संरक्षण विषयक धोरण ठरविताना वरिष्ठ श्रेणींचे त्रिदल अधिकारी परस्परांचे मुद्दे अधिक चांगल्या प्रकारे समजू शकतात.

पुष्कळ जणांचा असा समज आहे की ही संस्था अमेरिकेतील 'वेस्ट पॉईंट' या सैनिकी प्रबोधिनीचे रुपरेषेवर आधारित आहे. परंतु वस्तुस्थिती अगदीच वेगळी आहे.

दुसऱ्या महायुद्धात ॲबिसिनियामध्ये भारतीय फौजांनी गाजविलेल्या पराक्रमाचा गौरव म्हणून सुदान सरकारने फार मोठी रक्कम तत्कालीन भारत सरकारकडे सोपविली होती. त्यातूनच, येथील 'सुदान ब्लॉक' ही मध्यवर्ती इमारत येथे उभारली गेली.

ती संस्था निर्माण होण्यापूर्वी भारत सरकारने नेमलेल्या कमिटीने अमेरिकेतील वेस्ट पॉईंट, कॅनडामधील ॲकॅडमी, इंग्लंडमधील सँडहर्स्ट ॲकॅडमी व वुलवर्थ स्टाफ कॉलेज तसेच युरोपमधील इतर प्रमुख मिलिटरी ॲकेडमीजना भेट






दिली. त्यावेळी भारतात असलेल्या तशा शिक्षण संस्थांचीही पहाणी केली आणि भविष्यकाळाला अनुरुप अशी ही अकादमीची योजना मांडली. त्यांच्या दूरदृष्टीला द्यावे तितके धन्यवाद थोडेच आहेत.

**या अकादमीचा उद्देश नक्की कोणता?**

बौद्धिक, नैतिक आणि शारीरिक दृष्टचा• निकोप व मजबूत असे अधिकारी सदैव लाभत रहावेत यासाठी १५ ते १७॥ या वयोमर्यादेतील शालांत परीक्षा उत्तीर्ण मुलाना तसे बनविणे हाच अकादमीचा एकमेव उद्देश आहे. ते वय संस्कारक्षम असल्यानेच मुद्दाम ती वयोमर्यादा नक्की ठरविलेली आहे. कारण साधारणपणे अठरा वर्षांचे वय झाले की नवनवीन संस्कार रुजविणे अवघड होत जाते.

आपण असा प्रश्न विचारलात की हल्लीच्या ढासळत्या शिक्षणाचा परिणाम अकादमीच्या परीक्षेला बसणाऱ्या तसेच तोंडी चांचणी व अभिरुची–कसोटीपर्यंत येऊन ठाकलेल्या विद्यार्थ्यांवरही झालेला आढळत नाही काय? त्याचे माझ्या मते उत्तर हे आहे की शिक्षणाचा दर्जा सामान्यपणे ढासळत चालला आहे. (रुढ अर्थाने जे शिक्षण आहे, त्याचा) आणि आणखी काही काळ तरी जागतिक लष्करी क्षेत्रात इंग्रजी भाषा व पाश्चिमात्य रीतीरिवाजानाच मानमतराब आहे. त्यामुळे येथील सर्व शिक्षण इंग्रजीतूनच देणे भाग आहे. या एकंदर पार्श्वभूमीवर विचार करता मला असे अभिमानाने सांगावेसे वाटते की आमच्या परीक्षांसाठी येणारे भारतीय विद्यार्थी त्या त्या वयोमर्यादेचा व शैक्षणिक पातळीचा विचार करता अद्यापही पुष्कळच चांगल्या दर्जाचे आहेत. अजून तरी त्याबाबतीत निराश होण्याची पाळी आलेली नाही. पुढचे पुढे.

या अकादमीचे कमांडंट व डेप्युटी कमांडंट हे क्रमा क्रमाने आर्मी नेव्ही व एअर फोर्सचे असतात. परंतु कमांडंट व डेप्युटी दोघेही केव्हांही एकाच दलातील नसतात. तसेच बटालियन ओ. सी. स्क्वॉड्रन ओसी व डिव्हिजनल ओ. सी. सुद्धा वेगवेगळ्या दलातील असतात. फ्लाइट–कमांडर्सही तिन्ही दलातील असतात. सारांशाने बोलायचे तर प्रत्येक पातळीवर तिन्ही दलातील अधिकारी कटाक्षाने नेमले जातात. अर्थातच बहुसंख्य कॅडेट्स लष्कराचेच असल्याने आर्मी ऑफिसर्स जास्त असतात. तसेच इन्स्ट्रक्टर्सही आर्मीचेच अधिक आहेत.

या लष्करी अधिकाऱ्यांचेच जोडीला एम. ए. वा त्याहून अधिक उच्च शिक्षण घेतलेले लोकच प्राध्यापक व प्राचार्य म्हणून घेतले जातात. त्यांची निवड अतिशय काळजीपूर्वक केली जाते.

विद्यार्थ्यांना सर्व क्रमिक पुस्तके पुरविली जातात. तशीच त्या त्या विषयाची खास पुस्तकेही एका वेळी चार याप्रमाणे दिली जातात. शिवाय भला मोठा संदर्भ हॉल दिवसभर उघडाच असतो. दृक्श्राव्य पद्धती, त्रिमिती साधने यांचाही पुरेपूर वापर केला जातो. स्लाईड्स् चार्टस् यांच्याच जोडीला चित्रगृहसुद्धा आहे. त्या ठिकाणी विशेषत्वाने तिसऱ्या वर्षातील (पाचवी व सहावी टर्म) विद्यार्थ्यांसाठी प्रगत शैक्षणिक चित्रपट दाखविले जातात. नागरी प्राध्यापकांप्रमाणेच लष्करी, नौदल व हवाई–अधिकारीसुद्धा नियमितपणे शाळेतल्या वर्गांसारखे वर्ग घेतात. एअर ट्रेनिंग सेंटर थोड्या दूर अंतरावर असल्याने त्यांचेसाठी स्वतंत्र चित्रपटगृह व सभागृह आहे. आमच्या ग्रंथालयात एकूण ४०००० पुस्तके आहेत. असो. हे झाले सर्व निव्वळ शैक्षणिक विवेचन.

**अधिकारी कसा असावा?**

संरक्षक दलातील प्रत्येक शिपाई व अधिकारी हा निव्वळ राष्ट्रीयत्व ओळखणारा, जात–धर्म–पंथ निरपेक्ष असावा लागतो. शारीरिक सामर्थ्य, चापल्य, दमदारपणा (स्टॅमिना) व उत्तम प्रकारचे नीतीधैर्य, एकता, कडवी आज्ञांकिता, नियमितपणा, प्रत्येक बाबतीत स्वावलंबन, प्रतिकूल परिस्थितीवर मात करण्याची जिद्द, सहकार्याची, संघ प्रवृत्तीची भावना, भ्रातृभाव आणि आपला देश, आपले संरक्षक दल याविषयी रोमारोमात अभिमान, सरतेशेवटी आपला देश लोकशाही प्रधान असल्याने लोकतंत्राची बूज राखणे एवढे गुण त्याच्या अंगात भिनवावे लागतात. तेव्हाच तो उत्तम लढवय्या किंवा यंत्रज्ञ किंवा मेडिकल ऑर्डर्ली, फार काय लष्करी पात्रतेचा कारकून बनू शकतो. आणि अशा या सर्व गुणसंपन्न शिपायावर हुकमत गाजविणाऱ्या अधिकाऱ्याला प्राथमिक स्वरुप देण्याची महान जबाबदारी आमचेवर आहे.

अधिकारी म्हटला की त्याला वरील सर्व गुणवत्तेशिवाय आणखीही काही वैशिष्टये आत्मसात् करावी लागतात. उपक्रमशीलता, जवान हे सहकारी होत आपले चाकर नाहीत–ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट समजून घेऊन त्यांचा आदर, विश्वास आणि त्यांची निष्ठा मिळविणे तसेच त्यांच्या सुख–दु:खांची (वैयक्तिक आणि कौटुंबिक) जाणीव ठेऊन त्यातही त्याना साह्य व मार्गदर्शन करणे या गोष्टी याव्या लागतात. इतकेच काय त्या अत्यंत उत्कृष्टपणे आत्मसात कराव्या लागतात.

प्रत्येक विद्यार्थी त्या सर्व कसोट्याना शंभर टक्के उतरलाच पाहिजे. म्हणून तर एवढा खटाटोप. सरासरी दरवर्षी दर विद्यार्थ्यांसाठी आपण पाच एक हजार










रुपये खर्च करतो. (अर्थात् त्या खर्चाचा पर्स्पेक्टिव्ह फार मोठा घेतला आहे.) मग तेवढे भांडवल गुंतविल्यामुळे त्यातून मिळणारे अधिकारी रुपी उत्पादन शंभर नंबरी सोनेच असले पाहिजे याबाबत कटाक्षाने लक्ष दिले जाते. त्याविषयी कोणाचीही गय केली जात नाही.

एकतर एकदा विद्यार्थी येथे आले की त्यांच्या कुटुंबाचा वैयक्तिक, सामाजिक व आर्थिक दर्जा आपोआपच गळून पडतो. समान वागणूक, गणवेष, शिक्षण थोडक्यात "सहनाववतु, सहनौभुनक्तु, सहवीर्यं करवावहे," असे हे समष्टी जीवन त्याचे अंगी बाणले जाते.

चोवीस तासांपैकी प्रत्येक तासाच्या हालचालीवर बारीक नजर ठेवलेली असते. दररोजचा त्याचा व्यवहार त्याचा वर्ग किंवा तुकडी प्रमुख टिपून ठेवतो. दर टर्मचे शेवटी त्या गुणावगुणांचा तौलनिक अभ्यास होतो व जेथे तो विद्यार्थी उणा पडतो, तेथे ती उणीव भरून काढण्यासाठी त्याचेकडून जादा परिश्रम करून घेतले जातात. स्वाभाविकच विद्यार्थ्यांप्रमाणे येथील शिक्षकानाही आदर्श असेच जीवन जगावे लागते. इतके करूनही एकादा विद्यार्थी एकाद्या टर्मला कोणत्याही विषयात नापास झाला, तरीसुद्धा त्याला एकूण पहिल्या चार टर्म्समध्ये तीन वेळा पुन्हा परीक्षा देण्याची संधी दिली जाते. इतके करूनही तो तसाच राहिला, तर मात्र नाईलाजाने त्याला घरी पाठवावे लागते. अर्थात् तसा प्रसंग येऊ न देण्याची खबरदारी घेऊनही ते घडतेच. पण त्याला काय इलाज? कारण अपयश हेही 'मानवी'च आहे.

आमचे वाचनालय ज्या इमारतीत आहे त्यात प्रवेश केल्यानंतर जिन्याकडे जाणाऱ्या दोन वाटांचे समोर छतावर मधोमध पुढील ब्रीद कोरलेले आहे:

The safety, honour and welfare of your Country comes first always. And comfort of the men you command comes next. Your own case and comfort surely come last always and every time. आणि याच निष्ठेने येथे विद्यादानाचे सत्र अखंड, अविरतपणे सुरू आहे.

●●●





अनुक्रमणिका



# कदम कदम बढाये जा.....

पुरुषोत्तम बावकर

***लष्करी इंजिनियर्सच्या कर्तबगारीमुळेच १९६२ नंतर का होईना पण भारतीय सीमा सुरक्षित ठेवण्यासाठी हिमालय फोडून पुढे जाणे शक्य झाले आहे. अशाच एका कामगिरीचे हे वेधक शब्दचित्र.***

**मुंबईतील** केम्प्स् कॉर्नर किंवा मरीन ड्राईव्हचा फ्लायओव्हर ठराविक दिवसात पूरा होऊ शकत नाही. त्याच्या खर्चाचा अंदाज वाढतच जातो. याच्या उलट दुर्गम अशा सीमान्त प्रदेशातील अति कठीण आणि मानवी प्रयत्नांना केव्हा केव्हा अशक्य करणारी रस्ता बांधणी आणि पिसाट वाऱ्याप्रमाणे पळणाऱ्या नद्यावरील अशक्य ठिकाणावरील पूल बांधणी ठराविक वेळेच्या आत पूर्ण होत असलेली पाहून बॉर्डर रोडस्च्या इंजिनियर्स लोकांचं जितकं कौतुक आणि अभिनन्दन करावं तितकं थोडंच.

चिनी हल्ल्यानंतर आपल्या देशाच्या दुर्गम पहाडी प्रदेशातील रस्त्यांची आवश्यकता अधिकच भासू लागली. पाकिस्तान युद्धाच्या पूर्वी काही दिवस आधी–हिंदुस्तान तिबेट सीमान्त प्रदेश आणि श्रीनगर–लेहरोडला छायाचित्रणाच्या कामासाठी जाण्याचा योग आला आणि त्यावेळी बॉर्डररोडचे इंजिनियर्स करत असलेले अमोल आणि असामान्य अशा कामाचे प्रत्यक्ष दर्शन घडले.

सिमल्यापासून नव्वद मैलावर असलेल्या 'जोनरी' गावापासून बॉर्डर रोडची सुरूवात होते. जोनरी मुक्काम सोडल्यानंतर काही तासातच येथील धोकादायक जीवनाची खरी कल्पना आली. काही मैलांच्या अंतरावरच तरंडा खिंडीत 'मोगला' खडक कोसळून चार तंत्रज्ञ चिरडले गेले होते. दगड फोडून त्यांची शरीरे बाहेर काढण्याचा प्रयत्न चालला होता. तो भीषण अपघात पाहून हृदयाचं पाणी पाणी झालं. पण अशा प्रकारचे अपघात इथे रोजचेच होतात. आणि अशाही परिस्थितीत इथं काम चालूच असतं. आणखीन् काही अंतरावर रस्त्यावर भूस्खलन झाले होते. रस्ता उपसण्याचे काम चालू होते. पावसामुळे चिखल झाला होता. अशाही परिस्थितीत रहदारी चालूच होती. दुसऱ्या बाजूला गेलो आणि मुंबईचा पारसी इंजिनियर भेटला. सुट्टीवर परत जात होता. त्याने तर 'मुंबईचा ताल्या' भेटला म्हणून मला मिठीच मारली. आणि मलाही त्या पारसी बावाजीला तिथे पाहून त्या जातीविषयी असणाऱ्या आदरात आणखीनच भर पडली.

रात्रभर सारखा पाऊस पडतच होता. वीजा चमकत होत्या. बर्फही पडल्याचे दिसत होते. कारण त्या काळोख्या रात्रीही दूरवरची शिखरे चमकत होती. दुसऱ्या दिवशी वांगटू ब्रिज ओलांडला. खालून सतलज खळखळ वहात होती. हा पहिला भला मोठा बेली ब्रिज. असे अनेक बेली ब्रिज पुढे लागणार होते. आणि अशाच एका अत्यंत महत्वाच्या, चिनी सीमेवरील, एका पूलाच्या निर्मितीचे चित्रिकरण करण्यासाठी तर मी जात होतो.

करचमच्या अलिकडे काही अंतरावर रस्ता वाहून गेला होता. हे असं इथे नेहमीच चालतं. मोठ मोठे दगड कोसळतात. आणि रस्ता बंद होतो. पुन्हा इंजिनियर्स तयारीला लागतात आणि रस्ता चालू होतो. हा असा खेळ सारखा चालू असतो.

'पूंछ' पासून काहीं मैलावर असलेला डब्लीनचा बेली ब्रिज जेव्हां मी पाहिला तेव्हां बॉर्डर रोडच्या इंजिनियर्सच्या धाडसाची, कल्पकतेची आणि कार्यक्षमतेची मी मनातल्या मनात तारीफ केली. चारशे फूट खाली वेगाने जाणारी सतलज नदी. त्या नदीवर योग्य जागा पाहून मिलिटरीचे मोठमोठे ट्रक्स् जातील, त्यांचे वजन पेलेल असा पूल बांधणे ही काही साधीसुधी गोष्ट नव्हती.



**"हिमालय की चोटीसे फिर हमने ललकारा है..."**

अनुक्रमणिका

डब्लिनच्या पूलापासून सात आठ मैलावर सतलज आणि स्पिती या दोन नद्या मिळतात. स्पितीचे पाणी वर्फासारखे पारदर्शक आणि सतलजचे गढूळ. जिथे या दोन नद्यांचा संगम होतो तिथे उभं राहिलं की हा फरक सहज लक्षात येतो. संगमापासून जवळच आहे 'शिपकिल्ला पास.' त्याची उंची आहे पंधरा हजार फूट. आणि समोर तिबेटचा प्रदेश, जो चिन्यांच्या ताब्यात आहे. स्पिती आणि सतलजच्या संगमानंतर रस्ता चढणीला लागतो. इथे असलेला खडक फारच कठीण आहे. तो फोडून चौदा फूटांचा रुंद रस्ता करण्याचं काम चालू होतं. एक मैल लांबीच्या या रस्त्याला खिमरींग ढांग असे म्हणतात. मधला खडक कापून एकाद्या बोगद्याप्रमाणे हा रस्ता बनवला आहे. अधून मधून वरून खडक डोकावत असल्याने, जीप्स किंवा ट्रकसुद्धा संभाळून न्यावं लागतं. ह्या खिमरींग ढांगची सुरुवात ९००० फूट उंचीवर जिथे स्पिती सतलजचा संगम होतो तिथे होते. आणि शेवट ११००० हजार फूट उंचीवर होतो.

### लूप...पण कोणता ?

खिमरींग ढांग ओलांडून बाहेर आलो की रस्ता वळणावळणाने वर चढतो. तेरा वळणे घेऊन हा रस्ता पुन्हां सरळ मार्गाने वर चढतो. ह्या तेरा वळणाच्या रस्त्याला 'कीह' लूप्स असं नाव आहे. लूप याचा अर्थ इंजिनियरींग परिभाषेत एका प्रकारचे नागमोडी वळण असा आहे. ह्या कीह लूप्सबद्दल बोलताना मिलिटरी इंजिनियर्सनी केलेली कमाल असा उल्लेख केला जातो. आणि तो निरर्थक नाही. अशाच तऱ्हेचा सात लूप्सचा रस्ता या इंजिनियरानी, श्रीनगर–लेह रोडवर जोजीला खिंडीकडे तयार केला आहे. कीह लूप्सजवळ उभं राहून समोर नजर फेकली की तेरा वळणानी जाणारा रस्ता, खाली खिमरींग ढांग, उंचच उंच पहाड, आणि एका बाजूला दगडधोंड्यातून उड्या मारत, वर्फाचे तुषार फेकीत जाणारी स्पिती नदी. ते सौंदर्य अवर्णनीय असेच आहे. फक्त प्रत्यक्ष डोळ्यानीच पहावं.



जवाना ही तुम्ही (हायरे) कहाणी !
वचनी अमृत, कसाबी करणी ! !

'कीह' लूप्सपासून चढणारा रस्ता तेरा हजार फूटावर चढत जातो. आणि मग इथे, या इंजिनियर्स तंत्रज्ञाचा संबंध इतर जगाशी कायमचा तुटतो. येथील दळणवळणाचे एक महत्वाचे साधन, जिच्या योगे अन्नधान्याची सोय केली जाते, ते म्हणजे, आठवड्यातून, एकदा किंवा दोनदा, हवामानावर अवलंबून असलेली एअर सॉर्टी. विमानातून येणारे हे धान्य मग 'याक'च्या पाठीवर बांधून छोट्या छोट्या फौजी ठाण्यावर तसेच गावातील सरकारी धान्य दुकानातून पोचवलं जातं.

सीमान्त प्रदेशातील ह्या रस्त्यामुळे आपल्या देशाच्या संरक्षणास जशी मजबूती आली आहे तसेच आणखीनही काही महत्वाचे फायदे झाले आहेत. येथील दूरवर विखुरलेली खेडी. त्यांचा कधीही सुशिक्षित समाजाशी संबंध आला नव्हता, आणि पुढे केव्हां तो येऊ शकला नसता अशी ही खेडी सीमान्त प्रदेशातील रस्त्यामुळे जोडली गेली आहेत. निसर्गरम्य आणि सुसंपन्न असलेला हा प्रदेश आता भारताच्या व्यापारी नकाशावर येऊ लागला आहे.

सीमान्त प्रदेशातील रस्ते तयार करण्यासाठी एकोणीसशे बासष्ठ साली बॉर्डर रोड ऑर्गनायझेशन निर्माण करण्यात आली. ह्या संस्थेचे चार विभाग असून भारताच्या निरनिराळ्या सीमाप्रदेशात रस्ते बांधण्याचे कार्य करतात. बॉर्डररोड संस्था ही संरक्षणदलाचा एक विभाग असून फौजेतील एक उच्च पदस्थ अधिकारी त्याचा मुख्य असतो. फौजी अधिकाऱ्याना मदत म्हणून अनेक सिव्हीलियन अधिकारी तिथे काम करतात. ह्या सिव्हीलियन अधिकाऱ्याना काही खास सवलतीही दिल्या जातात.

### 'स्पीती' पुलाचे बांधकाम

या प्रदेशातील रस्ते बांधण्याचे एक खास तंत्र आहे. प्रथम रस्त्याचा प्लान आंखायचा. नंतर दोरीच्या सहाय्याने डोंगरमाथ्यावर चढायचे. योग्य जागा शोधून काढायच्या. तिथे ड्रिलींग करून ब्लास्टींग करायचे. नंतर छोटीशी पाऊलवाट बनवायची. हे झालं की रस्त्याची आंखणी करून पुन्हां मधे आडवे आलेले खडक दारुगोळ्याने फोडण्यासाठी लागणाऱ्या मशिनरीचे पार्ट सुटे करायचे व त्याना डोंगरमाथ्यावर चढवून त्याना असेम्बल करून काम सुरू करायचे. अशा प्रकारे जीप गाड्या पण तिथे असेम्बल करण्यात आल्या. हळुहळु दोन टोकानी रस्ता कापत यायचे. अशा तऱ्हेने रस्ता कापत एका ठराविक ठिकाणी येऊन मिळायचे. प्राथमिक अवस्थेतला रस्ता कापून तयार झाला की मग तो हवा तितका रुंद करायचा.

तिबेटच्या सरहद्दीपासून काही अंतरावर अलिकडे स्पीती नदीवर एक भला मोठा लांब पूल बांधायचा होता. हा पूल बांधून झाला की, त्या रस्त्याच्या कामाचे प्रथमावस्थेतील काम पूर्ण होणार होते. तिबेट सीमेवर असलेल्या आमच्या सैनिकाना रसद पोचविणे त्यामुळे शक्य होणार होते. ज्याठिकाणी हा पूल बांधण्यात येणार होता, तिथे स्पीतीचे पात्र खूपच खोल होते. तिथेच जवळपास दुसऱ्या बाजूने स्पीतीला एक लहान नाला येऊन मिळाला

होता. त्यांत गंधकाचे पाणी होते. साहजिकच त्यामुळे स्पीतीचे पाणी विषारी झाले होते. शिवाय इथे वर्फाचे पाणी वितळत असल्याने त्याठिकाणी चुकून पाण्याला स्पर्श झाला तर तो अवयव लुळा व्हावा.

स्पीती नदी ओलांडून पलिकडे जायचं हे एक मोठे दिव्यच होते. आणि ह्या महाभयंकर दिव्यातून, जीवनावरच्या संकटातून आमच्या जवानाना जावं लागत असे. एका मोठ्या दोराला धरून सुमारे साडेचारशेफूट खाली लोंबकळत उतरायचे आणि तारानी बांधलेल्या फळयांच्या पायपुलावरून सर्कस करत पलिकडे जायचे. एकाद्याचा चुकून पाय घसरला किंवा तोल गेला की पडलाच तो स्पीतीच्या पात्रात. चित्रिकरणासाठी दोरीवरून लोंबकळत पलिकडे जाण्याचा प्रत्यक्ष अनुभव मलाही घ्यावा लागला.

पुलाची सुरुवात झाली आणि तिथे चैतन्याचे वातावरण निर्माण झाले. मेजर तनेजा आणि त्यांचे इतर सहकारी इंजिनियर हजर होते. या महत्वाच्या पुलाची जबाबदारी खडकवासला येथील नॅशनल डिफेन्स ॲकडमीतून नुकत्याच आलेल्या लेफ्टनंट सेठीवर होती. या अगोदर या पुलाची सारी आंखणी लेफ्टनंट गुप्ताने केली होती. पण विशीच्या आतला हा तरुण अधिकारी जीपमधून जात असताना वरून दगड कोसळल्याने जीपसकट स्पीतीच्या खोऱ्यात कोसळला आणि त्यातच त्याचा अंत झाला. अशाप्रकारे सुमारे चारशे तरी तरुण अधिकारी आणि जवान ह्या रस्त्याच्या प्रथमावस्थेत मृत्युमुखी पडले असतील.

पुलासाठी लागणाऱ्या भारी वजनाच्या लोखंडी कांबा पायोनियर्स (बॉर्डर रोड संस्थेत रस्त्याच्या कामासाठी भरती केलेले मजूर) आपल्या खांद्यावरून आणत होते. कडाक्याची थंडी होती तरी या कामगारांची अंगे घामाने निथळत होती. त्यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा आनंद आणि उत्साह ओसंडत होता. देशाच्या संरक्षणासाठी कितीही श्रम करण्याची त्यांची तयारी होती. त्यादिवशी रात्री अकरा वाजेपर्यंत हे काम चालू होते. दुपारी पूलासाठी एका मोठ्या कड्याचा खोदलेला भाग कोसळल्यामुळे थोडा वेळ काम स्थगित ठेवण्यात आलं होतं तितकीच काय ती विश्रांती त्या पायोनियर्सना मिळाली होती.

दुसऱ्या दिवशी, सबंध दिवस पूलाचे काम चालले होते. सायंकाळी बेली पूलाचा शेंडा, दुसऱ्या किनाऱ्यावर स्थिरावला आणि सारा आसमंत हर्षोकल्लोळाने दुमदुमून गेला. ताबडतोब फुलानी सजवलेली एक जीप पूलावरून पलिकडे नेण्यात आली. सीमान्त प्रदेशाच्या रक्षणाच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचा असा पूल तयार झाला होता. तिबेट सीमेपर्यंत वाहतूक करणे आता शक्य झाले होते.

हिंदुस्थान तिबेट रस्त्याप्रमाणेच, श्रीनगर लेह रस्ता देशरक्षणाच्या दृष्टीने फार महत्वाचा आहे. चीनप्रमाणेच पाकिस्तानच्या सीमा प्रदेशाना लागूनच हा रस्ता जातो. हा रस्ता वर्षातून आठ महिने बर्फाच्छादीत असतो. आणि त्यावरील रहदारी बंद असते. मेमध्ये या रस्त्यावरील बर्फ खोदण्यात येतो आणि मग हा रस्ता पाऊस पडेपर्यंत खुला राहतो.

मी जोजीला पासला पोहोचलो तेव्हा, सोनमार्गपासून कारगीलपर्यंतचा बर्फाच्छादीत रस्ता बर्फ कापून, मोकळा करायला सुरुवात झाली होती. सोनमार्गपासून चारपाच मैलावर असलेल्या निलग्रार या ठिकाणी स्नो क्लिअरन्स युनिटचा कॅम्प होता. या कॅम्प्सभोवतालचा सारा प्रदेश बर्फाने माखला होता. चमकणाऱ्या बर्फाशिवाय दृष्टीपथात काहीच नव्हते.

दोनशे फूट उंचीचा बर्फ कापून त्याखालील रस्ता मोकळा करायचा, हे नवीन रस्ता बांधण्याइतकंच जिकीरीचं काम आहे. मूळ रस्ता कुठं आहे हे नुसतं अंदाजाने ठरवायचे. आणि हा जर अंदाज चुकला तर पुन्हा साऱ्या कामाला मूळापासून सुरुवात करायची. सहसा हा अंदाज चुकत नाही. त्या बर्फाच्या भिंती कापत असताना अनेकवेळा वरून बर्फाचा कडा कोसळतो. बर्फाची मोठी वादळे येतात. अशा वेळी बर्फात काम करणारी माणसे गाडली जातात. केव्हा केव्हा बर्फ कापण्यासाठी उपयोगात आणलेला मोठा बुलडोझर खोल दरीत जाऊन कोसळतो.

बर्फाचे वादळ निर्माण झाले; पुन्हा बर्फ पडू लागला की












# ऐक आई सीमेवरून...

ऐक आई सीमेवरून तुझी माझी ऐक कहाणी
कां धूसरशी दिसतेस ग थरथरणाऱ्या पिंपळपानी.
लाखातलेच आपुले गाव सदा तेजाने लखलखणारे
लाखातलेच माझे नाव तुझ्या ओठात थरथरणारे
चिमणचारा चोचीत देता तूच दिलेले बाळकडू
निघतांना जडावेल पाऊल माझे असे ओठांवर कां रडू?
असूं दे भान भावंडांना सीमेवरतीहि जगतोय् कुणी
ऐक आई सीमेवरून तुझी माझी ऐक कहाणी.
एकैक मरण जगण्यासाठी तुझ्या दुधाचे ऋण आड
आलोच तर विजयी होऊन नाहीतर ठेव बंद कवाड
दिवाभीताचे जिणे माझे उल्टे अंतराळ होते काल
सीमेवर कधीच होतो मात्र समेवर आलो आज
आशीर्वादाचे उंच हात मग काळजीचे का डोळा पाणी
ऐक आई सीमेवरून तुझी माझी ऐक कहाणी.
करू नकोस माझी याद पुसलेले कुंकू हाती धरून
त्याच कपाळाची ढाल आई माझ्या भवती कवच करून
न्हालेल्या रक्ताची आण मला ओढीत नेते कोस कोस
बर्फ–शीलांत थडगे माझे तसाच आठव माझा सोस.
एकच घाव शत्रूसाठी हाच आदेश रणांगणी
ऐक आई सीमेवरुन तुझी माझी ऐक कहाणी.
खोल दऱ्या माझ्यापुढे नभात एक घार नाही
थडथडते मरण दातांवर ओघळता आसू नाही
लटपटणारे लाकूड पाय कुठल्या उबेने सरतात पुढे
सांग उकलून माझ्या बाळा, मंगळसूत्राहितेच धडे.
शिरती ग कुठून काळजांत गोळी भंवती भ्याले सारे प्राणी
ऐक आई सीमेवरून ऐक उरली थोडी कहाणी.
बर्फांच्या गार शय्येत रुतलेले माझे खोल पाय
मरण चोचीने एकेक गिधाड प्राण प्राण वेचत जाय.
अशा मरणांचा पुण्य–टिळा पुसू न शके गिधाड थवा
गोठलेल्या धरणीवर बाळ तुझा ग विझूविझू वंशदिवा
तुझ्याच हातांची कुशी जणु अंकुरतील बर्फात वीरगाण
ऐक आई सीमेवरून माझी संपली . . . संपली क–हा–णी !

—वा. रा. सोनार

केलेले सारे श्रम फुकट जातात तरीपण निसर्गाशी जोराची टक्कर देऊन आमचे जवान ठराविक वेळी हा रस्ता पुरा करतातच. हे काम ठराविक वेळात पूरं झालं नाही तर, कारगील आणि लेह येथे, पाकिस्तान आणि चिन्यांतून टक्कर देणाऱ्या आपल्या सैन्याला, अन्न आणि शस्त्रांचा पुरवठा होणे अशक्यच आहे.

निलग्रारपासून 'कॅप्टन मोड' (टर्न) पर्यंतचा रस्ता मोकळा झाला होता. 'कॅप्टन मोड'पासून जोजीलापर्यंत आम्ही सारे चालत जात असू. भुसभुशीत बर्फात चालणे हे मोठे कसबच आहे.

कॅप्टन मोडवरून जाताना सारे जवान आणि ऑफिसर थांबून सॅल्यूट करताना मी पाहिलं होते. साहजिकच माझी उत्सुकता जागृत झाली म्हणून चौकशी केली. काही वर्षांपूर्वीची गोष्ट. त्यावेळी रस्ता थोडा खालून जात होता. वळणही तिथे बरंच मोठं होतं. पाऊस पडून चिखल झाला होता. अशा वेळी कॅप्टन वघवा नावाच्या एका ऑफिसरला त्याठिकाणी अपघात झाला. त्या अपघातातच तो मरण पावला. ज्याठिकाणी तो मेला, त्याठिकाणी त्याची समाधी बांधण्यात आली आहे. आणि त्याच ठिकाणी सारे सलाम करतात. आणि त्याला कारणही आहे. हा कॅप्टन रघवा म्हणे बर्फ खोदणाऱ्या जवानाना रात्री दिसतो. त्या वळणावर देखरेख ठेवतो.

दिवस रात्री खपून जवानानी रस्ता मोकळा केला होता. रस्ता वाहतुकीला खुला झाला होता.

हिंदुस्थान तिबेट आणि श्रीनगर – लेह रस्त्याबद्दलची थोडक्यात माहिती देऊन बॉर्डर रोड ऑर्गनायझेशन किती महत्वाचे कार्य करत आहे याची कल्पना देण्याचा प्रयत्न या लेखात केला आहे. वरील दोन रस्त्याशिवाय कच्छ, नेफा, जोशीमठ इत्यादी ठिकाणी ह्या संस्थेचे रस्ता बांधणी कार्य चालू आहे. गेल्या सहा वर्षांच्या थोडक्या कालावधीत ह्या संस्थेने रस्त्यांचे जाळे सीमारेषेपर्यंत पोचवून एक महान विक्रम केला आहे. कडाक्याची थंडी, झोंबणारा वारा, सतत पडणारा पाऊस आणि बर्फ, धुळीची वादळे; क्षणार्धात पत्ता लागू न देता कोसळणाऱ्या दरडी दबा धरून नसलेला शत्रू आणि सदैव डोक्यावर टांगलेली मृत्यूची टांगती तलवार या साऱ्या गोष्टींची जंत्री न करता केवळ देशरक्षणासाठीच बॉर्डर रोडचा नोकरवर्ग आपले कर्तव्य बजावत आहे.

दिव्यत्वाची जेथ प्रचिती
तेथे कर माझे जुळती ॥

• • •



अनुक्रमणिका



# छप्पर मैना

## (इंजिनियर्स)



**पॅटन टँकचा धुव्वा उडविण्यासाठी जी काही साधने वापरली गेली त्यात अॅटि टँक सुरुंग हे एक फार महत्वाचे साधन होते. कोअर ऑफ इंजिनियर्सच्या जवानांनी ती कामगिरी बजावली. त्या कोअरचे हे मूल्यांकन**

**मेजर जनरल बी. पी. वधेरा**

**दुसऱ्या** महायुद्धात आफ्रिकेमध्ये इंडियन सॅपर्स अँड माइनर्स उर्फ 'छप्पर-मैना' रेजिमेंटने बहुमोल कामगिरी बजावली, इतकेच काय, भारतीयांसाठी पहिला व्हिक्टोरिया क्रॉस सेकंड लेफ्टनंट पी. एस. भगत यानी (आता लेफ्टनंट जनरल भगत) मिळवून दिला. तेव्हा प्रथमच सामान्य नागरिकाना त्या रेजिमेंटचे नाव व कर्तृत्व कळले. त्यानंतरच्या काळात ती रेजिमेंट सगळीकडे चमकली. स्वातंत्र्योत्तर काळात जम्मू-काश्मीर, लडाख व नेफामधेही त्या रेजिमेंटने चांगलेच नाव कमाविले. अगदी अलिकडे १९६५ च्या संघर्षात पश्चिम आघाडीवर पाकिस्तानी रणगाडयांचा खिमा होण्यास जी अनेक कारणे घडली, त्यापैकी रणगाडे-नाशक सुरुंगाची पेरणी, हेही एक होय. आणि ती जबाबदारी या रेजिमेंटने चांगल्या प्रकारे पार पाडली.

शांतताकालीन कामगिरीत महाड नजिकचा बेली-ब्रिज, पानशेत वांचविण्याचा आटोकाट प्रयत्न, १९६७ साली राजस्तानमधे वेढल्या गेलेल्या आगगाडीची सुटका ही कामे त्या रेजिमेंटने केली. परंतु इतके होईपर्यंत छप्पर-मैनेचे रुपांतर होऊन ती रेजिमेंट 'इंजिनियर्स' या एकछत्री संघटनेत समाविष्ट करण्यात आली व मद्रास सॅपर्स, बेंगॉल इंजिनियर ग्रुप, बाँबे इंजिनियर ग्रुप, पायोनियर्स इत्यादि विविध पथकांचे एकीकरण होऊन ती सर्व 'इंजिनियर्स' या नावाने ओळखली जाऊ लागली.

मिलिटरी इंजिनियरींगमधेही विविध तऱ्हा आहेत. रस्ते आणि पूल हा सर्वांना परिचित असा कार्यक्रम झाला. त्याशिवाय लष्करी वसाहतींची आखणी-उभारणी; पाणीपुरवठा, इमारतींचे बांधकाम ही कामे सुद्धा सर्वांना माहीत आहेत. हा सर्व भाग सिव्हिल इंजिनियरींग फॅकल्टी म्हणून लष्करी परिभाषेत ओळखला जातो. त्याशिवाय कॉंबॅट इंजिनियरींग (रणांगणाशी संबंधित कामे) इलेक्ट्रिकल, मेकॅनिकल इंजियरींग, सॉईल रीसर्च व मटेरियल्स टेस्टिंग युनिट असे चार आणखी प्रमुख भाग आहेत.

सर्व सिव्हिल वर्क्स व शांतता-क्षेत्रातील (पीस स्टेशन्स) रस्ते-पूल ही कामे मिलिटरी इंजिनियर सर्व्हिस या केंद्रीय मुलकी संघटनेमार्फत पार पाडली जातात. त्या त्या कमांडमधील चीफ इंजिनियर हा त्याबाबत सर्व श्रेष्ठ अधिकारी असतो व तो नियमित लष्करी अधिकारी साधारणपणे ब्रिगेडियरच्या श्रेणीचा असतो. भारतीय एम. इ. एस.चा सर्वोच्च अधिकारी म्हणजे केंद्रीय सेना कार्यालयातील चीफ इंजिनियर होय, असे म्हटल्यास पुरेसे आहे. सरहद्दीवरील रस्त्यांचे बांधकामासाठी सरहद्द-रस्ते-निर्माण विभाग स्वतंत्रपणे काम करीत आहे. तरीही कॉंबॅट-झोन (रणक्षेत्र) मध्ये रस्ते आणि इमारतींचे बांधकाम, पूल उभारणे, वसाहती उभारणे ही कामे गणवेषधारी इंजिनियर्सनाच करावी लागतात. इलेक्ट्रिकल अँड मॅकेनिकल इंजियरिंगच्या लोकाना







## इतका खटाटोप कशाला ?

**दारू पिऊन बेफाम झिंगलेल्या स्थितीत आलेल्या एका सैनिकाला कॅप्टनपुढे उभे करण्यात आले.**

**"दारू पिण्याला मर्यादा हवी" कॅप्टनने लेक्चर द्यायला सुरूवात केली. त्यात ताळतंत्र राखला पाहिजे. दारू पिऊन झिंगण्याची ही सवय तू सोडलीस, तर उद्या तुला कदाचित् बढती मिळेल. तू कार्पोरल होशील. इतकंच काय, पण पुढे मागे सार्जंटही होशील. काय ?**

**"पण सर," तो सैनिक म्हणाला, "त्यासाठी दारू सोडण्याची गरज काय ? पहिला प्याला झोकल्याबरोबर मला आपलं कर्नल झाल्यासारखं वाटायला लागलंय्!"**

**—सदानंद चंदवणकर**

बेड लँपपासून तो मोठमोठ्या तोफांची दुरुस्ती करावी लागते. प्रत्येक रेजिमेंटला इ. एम. इ. चे युनिट जोडलेले असते, ते एवढ्याचसाठी. मेकॅनिकल ट्रान्स्पोर्ट, टेलेग्राफ, टेलिफोन वायरलेस, टेलेक्स वगैरे अत्याधुनिक संदेशवहन उपकरणांची देखभाल व दुरुस्ती याच लोकाना करावी लागते. **आणि विधायक कार्याप्रमाणे विध्वंसाचेही बिकट कर्म त्यानाच पार पाडावे लागते. आपल्याच हाताने, शत्रुचे उपयोगी पडू नयेत म्हणून तशीच वेळ आल्यास आपल्या देशातील पूल, रस्ते, इमारती, पेट्रोल वगैरेचे साठे, संदेश वहनाची केंद्रे उडवून देण्याची जबाबदारी इंजिनियर्सनाच पत्करावी लागते.**

### विविध प्रकारचे शिक्षणाची सोय

स्वातंत्र्यापूर्वी इंजिनियर ऑफिसर्ससाठी रुडकी (उत्तर प्रदेश) येथे पदवी परीक्षेचा अभ्यासक्रम पूर्ण करावा लागत असे व कॉबॅट इंजिनियरींगसाठी वूलवर्थ आणि स्पेशलायजेशनसाठी केंब्रिज येथे शिक्षण दिले जात असे. कनिष्ठ अधिकारी व पाईक यांचेसाठी कमांड वर्कशॉप्समध्ये जुजबी शिक्षणाची व्यवस्था होती. परंतु दुसऱ्या महायुद्धाने यंत्रविद्या व गती याना फार मोठे महत्व प्राप्त झाले. त्यानंतर इलेक्ट्रॉनिक्स व ॲटम—पॉवर, जेट—प्रॉपलजन, आणि अत्यंत बारीक गुंतागुंतीची शस्त्रास्त्रे, तोफा यांचा वापर सुरु झाल्याने स्वातंत्र्योत्तर काळात या शिक्षणाला अनन्यसाधारण महत्व प्राप्त झाले. त्याचाच परिणाम म्हणून पुणे येथे कॉलेज ऑफ मिलिटरी इंजिनियरींगची स्थापना झाली. १९४८ मध्ये सुरू झालेल्या त्या संस्थेत त्याकाळी डिप्लोमा—पातळीचे अभ्यासक्रम होते. आज तेथे पदव्युत्तर शिक्षण व स्टाफ—कोर्सेस (ब्रिग्रेडियर आणि वरिष्ठ अधिकाऱ्यासाठी सुद्धा) चालू आहेत. आणि तेथील अभ्यासक्रम व वाढता विकास पाहिल्यानंतर असे ठामपणे वाटू लागते की येत्या काही वर्षात ती संस्था म्हणजे एक प्रचंड अकादमी—विद्यापीठच बनेल. आणि लष्करी इंजियरिंगबाबतही भारत स्वयंपूर्ण बनेल.

मेजर जनरल वधेरा हे त्या कॉलेजचे कमांडट होते. त्यांच्या दिमतीला असले अनेक लेफ्टनंट कर्नल प्रत्येक विभागाचे प्रमुख शिक्षण म्हणून काम करतात. त्याना साहाय्यक असे अनेक तज्ञ मुल्की प्राध्यापक तेथे आहेत. प्रचंड लायब्ररी व मॉडेल रुम्समुळे शिक्षण देणे सोपे जाते.

पूल बांधणे, तर (रॅफ्ट) तयार करणे, रेल्वे रुळ टाकणे, बाँब नष्ट करणे, विध्वंसक कार्यवाहीची प्रात्यक्षिके इत्यादीसाठी तेथे भरपूर जागा व सोय केलेली आहे.

तेथील पदवीपरीक्षेचा अभ्यासक्रम तीन वर्षांचा आहे. त्यापैकी शहात्तर आठवड्यांचा पहिल्या वर्षांचा अभ्यासक्रम हा सिव्हिल मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल इंजिनियरींगचे एकत्रित मूलभूत शिक्षण देणारा आहे. पुढची दोन वर्षे त्या त्या विशिष्ट विभागाचे खास शिक्षणासाठी राखून ठेवलेली आहेत. (१) युद्धाशी संलग्न इंजिनियरींग (टॅक्टिकल) (२) कॉबॅट इंजिनियरिंग (३) बॉंब डिमॉलिशन (४) माईन लेईंग (५) माईन स्वीपींग (६) कॅमॉफ्लॉज (लपवाछपवी) (७) सॅबोटॉज (विध्वंस) (८) रोड्स-रेल्वेज (९) ब्रिजेस (१०) संदेशवहन (६) यंत्र दुरुस्ती (७) वाहनांची दुरुस्ती (८) सॉईल रीसर्च असे आठ प्रमुख विभाग आहेत. त्याशिवाय नेहमीचे मुल्की इंजिनियरींगचे अभ्यासक्रमही आहेतच. येथे दरवर्षी एकूण ७०० वरिष्ठ, कनिष्ठ अधिकारी व नॉन—कमिशंड ऑफिसर्स शिक्षण घेतात, येथील अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर इलेक्ट्रिकल-मेकॅनिकल्स युनिटची मंडळी सिकंदराबादला व सिग्नल कोअरमधील विद्यार्थी महूला आणखी दीड वर्ष शिक्षण घेतात व मगच त्यांची युनिटमधे नेमणूक होते. नद्या—कालवे यांची वाहतूक तसेच गोदी—यंत्रणा यांचेहि शिक्षण दिले जाते.

कमांडर जनरल माणेकजी यांच्या हुकमतीखाली असलेल्या नागरी संरक्षण संघटनेतील (सिव्हिल डिफेन्स) लोकांना गोदी-यंत्रणा व बाँब डिमॉलिशनचे शिक्षण येथेच दिले गेले हेही लक्षात ठेवण्यासारखे आहे.

### विकास नि विध्वंसाचे दर्शन

येथील एका मॉडेल रुममध्ये निरनिराळ्या प्रकारांचे पूल मांडून ठेवलेले आहेत. नदीच्या दोन्ही किनाऱ्याला दरड असल्यास कोणत्या पद्धतीने पूल बांधावेत; नसल्यास कोणती रचना वापरावी, आघाडीवरील टापूत जो काही लाकूडफाटा मिळेल त्याचा आधार घेऊन सुमारे वीस पंचवीस फूट रुंद व अजस्र रणगाडे सुरक्षितपणे जाऊ शकतील अशा पुलांची निर्मिती; रबरी होडगी फुगवून पाण्यात सोडणे, लाकडांचे तराफे एकत्र बांधून त्या आधारे पुलांची रचना करणे वगैरे तंत्रांची माहिती

ऐकताना मन थक्क होते. कारण कोणत्याहि क्षणी, पूर्वसूचनेशिवाय कसल्याही प्रकारचे पूल उभारून वाहतूक सुरू करण्याची जबाबदारी इंजिनियर्सवर पडते. त्यात जवान, कनिष्ठ अधिकारी आणि कमिशन्ड् ऑफिसर्स सगळेच आले.

आणखी एका मॉडेल रुममध्ये शिरलो आणि विध्वंसही किती पद्धतशीरपणे करावा लागतो, ते पाहून नवलच वाटले. पुलांचे उदाहरण घ्या ना. साध्या चुनाविटांच्या पुलापासून तो कँटिलिंव्हर पुलाचे सत्यानाशासाठी 'चार्जेस' (स्फोटक द्रव्ये) कोठे कशी रचावी लागतात, त्याना बत्ती केव्हा, कशी देतात, त्यासाठी कोणकोणती खबरदारी घ्यावी लागते, हे सर्व विस्ताराने मांडलेले आहे. आघाडीवरील खंदक, बंकर्सपासून तो दगडी वाडे, आणि अनेक मजली इमारती उडवून लावण्याच्या साऱ्या हिकमतींचा तपशील तेथे आहे. रेल्वे उखडण्यासाठी साधा प्लॅस्टिक चार्ज बसविण्यापासून तो सबंध स्टेशनातील सिग्नल, सांधे, केबिन्स इंजिने, गाड्या यांचा नायनाट कसा करावा हेही उमगून येते. याच ठिकाणी हंगेरीच्या उठावामुळे प्रसिद्धीस आलेल्या 'मॉलॅटॅव्ह कॉकटेल्स' पाहिल्या. कांचेच्या बरणीत स्फोटकांचे मिश्रण करून त्या बरण्या फेकल्या की स्फोट होऊन आग लागते. शिवाय काचेच्या तुकड्यानी इजा होते ती वेगळीच. त्यालाच म्हणतात 'मॉलॅटॅव्ह कॉकटेल्स्.'

त्याचप्रमाणे चाल करून जाणारे पायदळ दुहेरी, तिहेरी तीन ते सहा फूट रुंद व बारा पंधरा फूट उंच कांटेरी तारांचे भेंडोळे कापूनही पुढे आलेच तर त्याच्या चिंधड्या उडविण्यासाठी पेरण्यात येणारे अँटि–पर्सोनेल व फ्रॅगमेंटेशन माइन्स पाहिजे. तसेच त्या बॉम्बमधील फ्यूज काढून टाकून त्याना निष्प्रभ बनविणारी यंत्रणाही पाहिली. पॅटनचा कर्दनकाळ ठरलेले संपूर्णपणे भारतीय बनावटीचे चौदा पौंडी प्लॅस्टिक माईन्ससुद्धा येथे आहेत. तसेच जोधपूर शहरावर पाकिस्तानी विमानानी फेकलेल्या हजार पौंडी बॉंबचाही लोखंडी सांगाडा येथे पाहाण्यास मिळाला.

सुरुंग पेरण्याचीही एक विशिष्ट पद्धत असते. सुरुंगाच्या वाती जमिनीपासून जेमतेम दोन चार इंच वर असतात. चालणाऱ्या जवानांच्या बुटाचा खिळा त्याना लागला कीं त्यांचा स्फोट होऊन जवानाचे दोन्ही पाय आधी उडतात नि तो आडवा होतो. त्यावेळी पोषाखातील इतर लोखंडी भागापैकी कशाचाही स्पर्श दुसऱ्या वातीला झाला की त्याची खांडोळीच उडतात. हा झाला मॅग्नेटिक माईनचा कहर. फ्रॅगमेंटेशन माईनला स्पर्श झाला रे झाला की त्या व्यक्तींच्या चिंधड्या चिंधड्या होतात. तर अन्य काही माईन्स फुटले की ज्वालामध्ये तो जवान होरपळून निघतो. तेव्हा शत्रूच्या टापूत पुढे घुसण्यापूर्वी ते सर्व सुरुंग अक्षरशः वेचावे लागतात. त्यासाठी हातात 'डिटेक्टर' घेऊन पोटावर सरपटत तपासणी करावी लागते. यंत्राने सुरुंगाचा पत्ता लागला की त्याची वात कापून काढावी तरी लागते किंवा टाईम-फ्यूज असल्यास 'टाईमिंग' नष्ट करावे लागते. त्यामुळेच इंजिनियर्सना आपला जीव तळहातावर घेऊनच वावरावे लागते. तरीही ते सदैव सगळीकडे वावरून आपले ब्रीद सार्थ करीत असतात. ●●●

[टीपः–मेजर जनरल बी. पी. चोप्रा हे आता दुर्गापूर येथील हिंदुस्थान स्टीलचे सरसंचालक या जागी रुजू झाले आहेत.]

# वाचक हो ! वाचा ! वाचा !!

## दीपावलीची रौप्य महोत्सवी वर्षाकडे यशस्वी वाटचाल

### ☆ कादंबरी स्पर्धा ☆

# एक हजार रुपयाची बक्षिसे

'दीपावली'च्या १९६८ च्या दिवाळी अंकासाठी आम्ही पुढील योजना सहर्ष जाहीर करीत आहोत.

- या कादंबरी स्पर्धेकरिता विषयाचे बंधन मुळीच नाही.
- कादंबरी स्वतंत्र हवी. अनुवाद, रूपांतर, मूळ कल्पना परकीय वगैरे मुळीच नकोत.
- पहिल्या दोन निवडलेल्या कादंबऱ्याना अनुक्रमे ६०० रु. व ४०० रु. ची पारितोषिके देण्यात येतील.
- छापलेल्या कादंबऱ्यांचे पुस्तक प्रकाशनाबाबतचे अधिकार लेखकाधीनच रहातील.
- परीक्षकांचा निर्णय अंतीम राहील. एखाद्या क्रमांकाला योग्य अशी कादंबरी न आल्यास ते पारितोषिक रद्द करण्याचा अथवा विभागून देण्याचा अधिकार परीक्षकांचा राहील.
- परीक्षकांचा निर्णय 'दीपावली'च्या ऑक्टोबर १९६८ च्या अंकात जाहीर केला जाईल व निवडलेली प्रथम क्रमांकाची कादंबरी दिवाळी अंकात व दुसऱ्या क्रमांकाची वर्षारंभ अंकात प्रसिद्ध केली जाईल.
- कादंबरीसाठी आकार बंधन २०००० ते २५००० शब्द.
- कादंबरी पाठविण्याची शेवटची मुदत – ३० जून १९६८.
- ही कादंबरी स्पर्धा सर्वानाच खुली आहे. परंतु प्रत्येक स्पर्धकाने आपल्या हस्तलिखितासोबत परतीसाठी व निर्णयासाठी एक रुपयाचे पोस्टेज लावावे.
- हस्तलिखित पाठविण्याचा पत्ता – दीपावली कार्यालय, ४०–४२ केनेडी ब्रिज, गिरगाव, मुंबई – ४.

अनुक्रमणिका



# डंकर्कचे 'दैव' जाणिले कुणी?

**तुर्त डंकर्कचा नाद सोडा.... पॅरिसच्या रोखाने तातडतोब कूच करा—हिटलरच्या त्या हुकूमाने काय घडले? इतिहास!!**

**मे १९४०.** साऱ्या कसलेल्या सेनापतींचा सल्ला धुडकाऊन हिटलर वागत होता. बेल्जम जर्मन सैनिकांच्या टाचेखाली चिरडलं गेलं होतं. पहिल्या महायुद्धातील एका य:कश्चित कॉर्पोरेलच्या 'आतल्या' आवाजाने जर्मन चिलखती तुकड्यांना एकापाठोपाठ एक देश जिंकण्यात यश मिळाल्याने सारे जग अवाक् बनले होते.

व्हॉन रुडेनस्टंड आपल्या 'आर्मी ग्रुप ए' सहित दक्षिणेकडून फ्रान्स मधून नॉर्मंडीच्या किनाऱ्यावर तुफान वेगाने येऊ लागले होते. तर विरुद्ध दिशेने फिल्डमार्शल फेडॉ व्हॉन बॉक बेल्जममधून नॉर्मंडीच्या किनाऱ्याकडे निघाला होता. थोडाफार प्रतिकार करणाऱ्या सैन्याचे शिरकाण करीत, दोस्त सैन्याला कैचीत पकडण्यासाठी तो धडाडीने पुढे चालला होता. त्या शर्यतीत व्हॉन बॉकच्या रणगाड्यांनी मुसंडी मारली. त्याला तोंड देण्यासाठी दोस्त राष्ट्रांच्या डाव्या बगलेची सेना खाली ॲरडेनन्समध्ये उतरली. आणि विरुद्ध दिशेला अर्धवर्तुळाकार व्यूहरचनेत व्हॉन रुडेनस्टंडचे रणगाडे त्यांचा बळी घेण्याला टपलेले पाहून दोस्तांचे धाबेच दणाणले. कारण म्युजेसच्या मैदानात फ्रेंचांची ससेहोलपट करून ते जर्मन रणगाडे दोस्त सैन्याला पाचर ठोकण्यात संपूर्णपणे यशस्वी झाले होते.

रणगाडे पुढे सरकले रे सरकले की पाठोपाठ आर्मर्ड-कॅरिअर्स आणि ट्रक्समधून पायदळ धडाधड उड्या टाकून आपली पकड घट्ट बसवित होते. व्हॉन बॉक आणि रुडेनस्टंड यांच्या लोखंडी कैचीतून सुटण्याचे दोस्तांचे सारे प्रयत्न फोल ठरले होते. उत्तर, दक्षिण आणि पूर्व या तिन्ही दिशा बंद झाल्या होत्या. आग्नेय दिशेला असलेल्या डंकर्क बंदरात सहीसलामत पोचणे हा एकच घोर जवळ जवळ चार लक्ष दोस्त सैन्याला पडलेला होता. त्यांना वांचवायचे कसे? या चिंतेने चर्चिलची झोप उडाली होती. चार लाख सैनिकांपैकी चाळीस हजार तरी (दहा टक्के) सुखरुपपणे किंवा जखमी अवस्थेत का होईना, सोडविता येतील अशी ग्वाही देण्याची हिंमत जनरल अलेक्झांडरची सुद्धा नव्हती. अत्यंत शांत, धीरोदात्त, कनवाळू आणि वास्तववादी म्हणून लौकीक मिळविलेल्या ॲलेक्झांडरची ही गत! मग चर्चिलची अवस्था पिंजऱ्यात कोंडलेल्या बंगाली वाघासारखी न झाली तरच नवल. सगळेच काही उलट सुलट होऊ पहात होते. रशिया आणि जर्मनी यांची दोस्ती कायम होती. अमेरिकन लोक आत्ता कोठे त्या युद्धाकडे जरा अधिक बारकाईने बघू लागले होते. परंतु 'उधार उसनवार' करारसुद्धा अजूनी व्हावयाचाच होता. रुडेनस्टंडचे रणगाडे डंकर्कपासून पंधरा मैलावर येऊन ठेपले होते. दोस्तांची परिस्थिति अधिकच बिकट झाली होती. चर्चिलने दैवावर हवाला ठेऊन मनाची तयारी अशी चालवली होती की, "गेला तो दिवस आपला. मेची वीस तारीख उलटली. जर्मन रणगाडे

आपल्या सैन्याची दमछाक करीत आहेत. आपण एकसारखे समुद्र किनाऱ्याकडे लोटले जात आहोत. येत्या पाच सहा दिवसातच पार्लमेंटमध्ये आपल्याला नाक मुठीत धरून पराभवाची घोषणा करावी लागणार."

पण 'दैव जाणिले कुणी' हेच खरे. येथूनच खऱ्या अर्थाने बाजी उलटली. आणि पंचवीस मे ते चार जूनच्या दरम्यान तीन लक्ष अठ्याऐंशी हजार ब्रिटिश सैनिक सुखरूपपणे इंग्लंडमध्ये परत जाऊ शकले. 'शिर सलामत तो पगडी पचास' या न्यायाने डंकर्कमधून निघून जाताना बंदुका, तोफा, जीप्स, मोटारी आणि इतर लष्करी सामुग्रीचा नाश करता येईल तेवढा ब्रिटिशानी केला. तरीसुद्धा सुमारे दोन लक्ष सैन्याला दोन ते तीन आठवडे पुरेल एवढे प्रचंड साहित्य जर्मन सैनिकांच्या हाती पडले. परंतु वेळ निघून गेली होती. असे कसे घडले हे आक्रित?

त्या रणधुमाळीत दररोज निकामी होणाऱ्या रणगाड्यांची संख्या हिटलरला दर रात्री कळविली जात असे. त्या माहितीचा अर्थ प्रत्यक्ष आघाडीवरील अधिकाऱ्याना एवढाच अभिप्रेत होता की, पन्नास रणगाडे नष्ट झाले असले, तरी त्यापैकी निदान चाळीस दुसऱ्या दिवशी दुरुस्त करून वापरता येतील. पण त्यांच्या व जर्मनीच्या दुर्दैवाने बर्लिनमध्ये बसलेला हिटलर व त्याचे तेथील सल्लागार असेच गृहित धरून चालले होते की, "पन्नास रणगाडे निकामी झाले याचा अर्थ त्यांचा सत्यानाश झाला." त्यामुळे संपूर्ण रणगाडासामर्थ्य नष्ट होईल, अशीच भीति बहुधा हिटलरला वाटू लागली असावी.

दिनांक २४ मे रोजी हिटलरने मनाशी काहीतरी बेत ठरविला आणि रात्रीच्या सुमारास रुडेनस्टंडच्या हातात हुकूम पडला, "तूर्त इंग्रजांचा नाद सोडा. पॅरिसच्या रोखाने ताबडतोब कूच करा— हिटलर" तो हुकूम पहाताक्षणीच रुडेनस्टंड हतबुद्ध झाला. पहिल्या महायुद्धापासून अनेक मोहिमा यशस्वीपणे हाताळणाऱ्या त्या वयोवृद्ध सेनानीची मती गुंग झाली. कारण तो डंकर्क काबीज करण्याची योजना पक्की करून बसला होता. आणि फील्ड मार्शल बॉक तसेच हिटलरलाही तिचा तपशील त्याने कळविला होता. पण करतो काय बिचारा? तो पडला हुकूमाचा ताबेदार.....

पंचवीस तारखेच्या पहाटे आघाडीवरील रणगाडा पथकांच्या प्रमुखाना हिटलरची ती आज्ञा कळविण्यासाठी रुडेनस्टंडचा एक स्टाफ ऑफिसर कर्नल व्हॉन ट्रेस्कॉव मोटारीने निघाला. बेथ्युने ते सेंट ओमोर पर्यंत जर्मन रणगाडे पसरलेले होते. निम्मे अधिक अंतर काटले. मोठ्या नाराजीने जर्मन वायरलेस टेलिफोनवरून एकेका युनिटला ते होते तेथेच थांबण्याचे हुकूम मिळाले.

परंतु दैवदुर्विलास एवढ्यावरच थांबला नाही. कर्नल साहेबांची मोटार दोस्त सैन्यांच्या छावणीसही प्रसंगी खेटून भरधाव चालली होती. एकाएकी ड्रायव्हर गाडीबाहेर फेकला गेला. टेहळ्या दोस्त सैनिकांच्या गोळ्यांचा तो प्रताप. दुसऱ्याक्षणी मोटारीतून आगीचे डोंब उसळले. पेट्रोल पेटले होते. कर्नल साहेबांनी कसलाही विचार न करता झटकन बाहेर उडी मारली. व ते लपत छपत नजिकच्या जंगलात नाहीसे झाले. आणि हळूहळू मजल दरमजल करीत एका जर्मन छावणीत जाऊन पोचले.

दरम्यान गोळ्या झाडणाऱ्या दोस्त सैनिकानी एवढे लक्षात घेतले होते की त्या मोटारीवर वरिष्ठ अधिकाऱ्याची पताका काही क्षणापूर्वी झळकत होती. त्यांचा संशय दुणावला. आणि आगीच्या लोळाची पर्वा न करता काही सैनिक मोटारीच्या शक्य तितक्या जवळ जाऊन आत डोकाऊ लागले. चाट पडण्याची पाळी आता त्यांची होती. मागच्या सीटवर एक ब्रीफ—केस सुरक्षितपणे पडलेली होती. ती त्यांनी चपळाईने काढून घेतली व उघडून पहाताच त्यांचा स्वतःच्या डोळ्यावरच विश्वास बसेना.

ब्रिटिशांचा नाद सोडून पॅरिसच्या दिशेने वाटचाल करावयाचा तो हुकूम होता.

कांही क्षणातच त्या हुकूमाचे क्रांतीकारक स्वरूप त्यांच्या लक्षात आले. आता ते निर्विघ्नपणे इंग्लंडला जाऊ शकतील एवढी खात्री, एवढा विश्वास त्यांना आला. सुमारे महिना दीड-महिना माघार—माघार—माघार हाच एकमेव शब्द कानात घुमत होता. पराभवाची चीड व माघारीची नामुष्की मनात सलत होती. तो सल समूळ उपटला गेला.

त्या बहाद्दर जवानानी क्षणाचाही विलंब न करता जनरल ॲलेक्झांडर यांच्या हातात तो कागद शक्य तितक्या जलद पोचता केला. ॲलेक्झांडरचीही अक्कल क्षणभर काम करेनाशी झाली, इतका प्रचंड उलथापालथ करणारा तो हुकूम होता. त्याने लगेच डंकर्कच्या चिंचोळ्या किनारपट्टीतील सेनाप्रमुख गॉर्ट यांना ती माहिती कळविली. आणि पुढचे सगळे कार्य त्यानुसार करण्यासाठी गॉर्ट यानी नवे हुकूम सोडले.

अशा तऱ्हेने इतिहासातील एका अत्यंत विक्षिप्त व युद्ध-शास्त्राला धुडकावून लावणाऱ्या पहिल्या हुकूमामुळे हिटलरच्या अपयशाची उलटी पाऊले पडू लागली. त्याने तो हुकूम कां दिला हे गूढ आजही, १९६८ साली, तसेच कायम आहे. एवढा महत्वाचा हुकूम घेऊन जाणाऱ्या अधिकाऱ्याच्या संरक्षणाची व त्याहीपेक्षा त्या आज्ञापत्रकाची नीट व्यवस्था रुडंटस्टंडने इतक्या बेपर्वाईने कां केली? मोटारीला आग लागलेली पाहून स्वतःचे प्राण वाचविण्यासाठी लक्षावधी ब्रिटिश सैन्यालाही जाणून बुजून जीवदान देण्याचे त्या कर्नलचे काय अडले होते? शेकडो लहान मोठ्या नानाप्रकारच्या बोटीतून इंग्लंडला परतणाऱ्या दोस्त सैन्याचा फडशा पाडण्याची फारशी खटपट जर्मन पाणबुड्यानी कां केली नाही? "नियति!" हेच बहुधा त्याचे उत्तर असावे.

• • •

# धन्वंतरी





—मेजर जनरल करानी



**मालक, आपण विचारपूस केलीत—त्यामुळे दहा हत्तींचे बळ संचारले....**

**मेडिकल** कॉलेज हे काही प्रेक्षणीय म्हणून सामान्य माणसाने भेट द्यावे असे स्थान नसते. एक वेळ इंजिनियरींग कॉलेज किंवा पॉलिटेक्निक बघावेसे वाटते. कारण तिथे कमी अधिक प्रमाणात कॅप्सटन्स् लेथ्स्, बांधकामे, व धरणे यांची वेगवेगळी मॉडेल्स बघावयास तरी मिळतात आणि चांगल्या घरचे विद्यार्थीसुद्धा तेलकट काळकट ओव्हरऑल्स घालून हात काळे करताना पाहिले की एक प्रकारे समृद्ध, सुखी समाजाचा सूड उगविल्याचे किंचितसे समाधान क्षणभर तरळून जाते.

अगदी याउलट अवस्था मेडिकल कॉलेजांची असते. ते पहाण्यासाठी सामान्यपणे आधी एखाद्या भल्या मोठ्या रुग्णालयाच्या फाटकात शिरावे लागते. यमाच्या दरबाराची झलक पहाणे नशिबी येते. खाजगी किंवा सरकारी दोन्ही प्रकारची रुग्णालये टेफिकीरपणाच्या बाबतीत वेगवेगळ्या पद्धतीने एकमेकांशी स्पर्धाच करीत असतात. फरक इतकाच की एका ठिकाणी पैशांची रास ओतून सर्व काही विकत घेतले जात असल्याने आपलेच दात व आपलेच ओठ अशी परिस्थिती असते. तर दुसऱ्या ठिकाणी त्या मानाने कमी पैसा खर्च होत असल्याने जिभेवर बंधन ठेवण्याची मर्यादा थोडीफार सैल पडलेली असते. म्हणून आर्म्ड फोर्सेस मेडिकल कॉलेज (संरक्षक दल वैद्यकीय महाविद्यालय—पुणे) या संस्थेची पहाणी म्हणजे एखाद्या अद्ययावत रुग्णालयाला भेट देणे, तिथला थाटमाट बघणे आणि जमल्यास डॉक्टरांशी गप्पा मारून मिळेल तेवढी माहिती मिळविणे असा माझा होरा. परंतु तो साफ चुकला. चुकीचाही आनंद होतो का कुणाला? हो, यावेळी तरी झाला. कारण मी पाहिली ती एक अद्ययावत विकसनशील, सजीव संस्था. तिथल्या फुलाफुलातून, इमारतीच्या चिरेबंदीतून, निर्जिव वस्तूंमधूनसुद्धा जीवन—हंसरे जीवन उमलत, फुलत होते.

संरक्षक दलांची वैद्यकीय गरज ही एरवीच्या दुखण्याबाण्याइतकीच मर्यादित नसते. कारण पृथ्वीच्या पाठीवर कोठेही आपले जवान कामगिरीवर जातात. त्या त्या ठिकाणचे हवामान, अन्नपाणी व इतर वातावरण याना अनुसरून तेथील विशिष्ट रोगराईची संपूर्ण माहिती व तिचे उपचार या डॉक्टर मंडळीना करावे लागतात. तसेच प्रत्यक्ष रणक्षेत्रात बंदुका, उखळी तोफा, बॉंब, विषारी वायू, दाहक (नापाम) बॉंब्ज आणि आता अणू व उद्र (हैड्रोजन) अस्त्रे व प्रक्षेपणास्त्रे यामुळे होणाऱ्या दुखापती व व्याधी दूर करण्याची जबाबदारी वैद्यकीय विभागाची असते. प्रत्येक जवानाला प्रथमोपचाराची जुजबी माहिती असावी लागते. रक्तस्त्राव थांबविण्यासाठी टॉनिक्वेट बसविणे, पाणी शुद्ध करण्यासाठी औषधांचा वापर वगैरे प्राथमिक माहिती इन्स्ट्रक्टर्समार्फत जवानांपर्यंत द्यावी लगते. त्या इन्स्ट्रक्टर्सना शिक्षण द्यावे लागते. तसेच स्ट्रेचरवरून जखमींची ने—आण करणे, मेल नर्सिंग—नर्सिंग ऑर्डर्लीज आणि चढत्या भाजणीप्रमाणे वैद्यकीय चिकित्सा व उपचारांचे ज्ञान वैद्यकीय पथकातील लोकांना द्यावे लागते. रक्त देणे, रक्त काढून घेणे, त्याची (प्लाजमा) भुकटी बनविणे, इंजेक्शन्स, एक्स-रे, ऑक्यूपेशनल थेरपी एक ना दोन कितीतरी विभाग असतात.

या गरजा भागविण्यासाठी तिन्ही दलांची एकच वैद्यकीय सर्व्हिस ठेवण्यात आली असून तिलाच आर्मी मेडिकल कोअर म्हणतात. डॉक्टर आणि नर्सेस यांची तिन्ही दलात बदली होते. हेतू हा की त्याना कोणत्याही व्याधीवर उपचार करता यावेत.

या जगात तिन्ही दलांसाठी डॉक्टर तयार करणारे संयुक्त असे हे एकच एक महाविद्यालय कुतुहलाचा विषय बनलेले







धन्वंतरी म्हटला की वैदू, वैद्य, डॉक्टर, सर्जन अशी अनेक रुपे डोळ्यासमोर उभी रहातात. त्या सर्वांपेक्षा वेगळा प्रसन्न व कर्तबगार असा हा 'धन्वंतरी' आहे.

आहे. भारताचा हा प्रयोग यशस्वी झालेला असल्याने इतर राष्ट्रेही त्याच्या अनुकरणाचा विचार करीत आहेत. येथील कार्याचा व्याप पाहिल्यानंतर असेच वाटते की खरे तर हे स्वयंभू वैद्यकीय विद्यापीठ मानले जावे. आज तरी मात्र त्याला तो दर्जा नाही. तेथील विद्यार्थी विद्यार्थिनी एम. बी. बी. एस., बी. एस्सी. (डेंटिस्ट्री) बी. एसस्सी. (नर्सिंग) या पदव्या पुणे विद्यापीठाकडून घेतात.

मेजर जनरल करानी हे त्या महाविद्यालयाचे कमांडर आहेत. त्यानी पन्नाशी केव्हाच ओलांडली आहे. पण कॉलेजमधील सर्व विभाग दाखविताना त्यांच्या चपलतेची बरोबरी करणे अगदी उमद्या तरुणानासुद्धा अशक्य होते, इतका हा माणूस चपळ आहे.

येथे एम. बी. बी. एस. साठी दरवर्षी १२० विद्यार्थी–विद्यार्थिनी घेतले जातात. त्या सर्वांना उत्तम गुण मिळालेले असावे लागतातच. त्याशिवाय मुख्यत्वे करून संरक्षक दलासाठी वैद्यकीय अधिकारी तयार करणे हे या महाविद्यालयाचे कार्य असल्याने मुलाखतीचे वेळी विविध प्रकारे अभिरुचीची परीक्षा (Aptitude Test) घेतली जाते. निवड झालेल्यांची शारीरिक तपासणी लष्करी 'ए' श्रेणीनुसार घेतली जाते. त्या १२० जणांपैकी निम्म्याना दरमहा शंभर रुपये शिष्यवृत्ती मिळते.

सर्व विद्यार्थी–विद्यार्थिनींना महाविद्यालयाच्या आवारातच बांधलेल्या स्वतंत्र वसतिगृहात रहावे लावते शिवाय दररोज खास गणवेष घालूनच यावे लागते. गणवेषाचा रंग मात्र तरुणाना एकदम आवडेल व खुलेल अशा रसिकतेनेच निवडलेला आहे.

पुणे येथील १२०० खाटांचे लष्करी रुग्णालय व सोनावणे मॅटर्निटी हॉस्पिटल येथे ते विद्यार्थी प्रत्यक्ष शिक्षण घेतात. औंध येथील छातीच्या विकारांचे रुग्णालयही लवकरच तेथे हलविण्यात येणार असल्याने त्या विशिष्ट विभागाचेही तज्ज्ञ अधिक संख्येने तेथे शिकवून तयार केले जातील. ही झाली नियमित विद्यार्थ्यांची व्यवस्था.

त्याशिवाय दरवर्षी आर्मीसाठी एकूण पन्नास विविध कोर्सेस तेथे घेतले जातात. निमवैद्यकीय पथके, मलेरिया पथके, एक्सरे तंत्रज्ञ, दंत वैद्यक, शल्यक्रिया, हाडांचे, चामडीचे, कानांचे स्पेशॅलिस्ट, नेत्रवैद्यक, एकना दोन–अशा एकूण पन्नास कोर्सेससाठी प्रत्येकी शंभराच्या तुकड्या येतात व शिकून परत जातात. त्याचप्रमाणे वीस विषयांचे पदव्युत्तर शिक्षणाचीही सोय तेथे आहे.

कलकत्ता, दिल्ली व लखनौ येथील आर्मी कमांड हॉस्पिटल्स मधून अनेक केसेसबाबत या महाविद्यालयाचा सल्ला घेतला जातो. त्यासाठी एक प्रचंड 'मेडिकल रेफरन्स लायब्ररी' आहे.

ती तिन्ही मोठी रुग्णालये व इतर छोटी मोठी लष्करी उपचारकेंद्रे याना लागणारे सेरा, ब्लड, ब्लड प्लाजमा, कल्चर्स, सलाईन, देवीखेरीज इतर बहुतेक सर्व व्हॅक्सिन्स, लॅबोरेटरी इक्वीपमेंट, औषधे, रेडिओ आयसोटोप्स आदींचा पुरवठा येथूनच होतो; भलेही ते केंद्र लडाखमधील असो वा कन्याकुमारीचे. "हिस्टोपॅथॉलाजी"चीही एक प्रचंड रेफरन्स लायब्ररी येथे आहे. येथील लायब्ररीमध्ये तीन हजार ग्रंथ आहेत. त्याशिवाय दर तिमाहीला एक जर्नल प्रसिद्ध केले जाते. तसेच वैद्यकीय व्यवसायाला वाहिलेली व संशोधनात्मक कार्याची तपशीलवार माहिती देणारी जी नियतकालिके जगात प्रसिद्ध होतात, त्यापैकी बहुतेक सर्व येथील विद्यार्थ्यांना–उपलब्ध करून दिली जातात. ती नेहेमी संदर्भ व वाचनालय विभागात मिळतात.

या महाविद्यालयाचा पसारा एवढा प्रचंड आहे की येथे एकोणतीस विभाग आहेत. त्याशिवाय पंचवीस एक संशोधक नेमाने संशोधनकार्यात गढलेले असतातच. तेथे प्राध्यापक म्हणून काम करणारे लोक हे वैद्यकीय क्षेत्रातले तज्ज्ञच असावे लागतात. पण निव्वळ अभ्यासावरच भर दिला जातो, असेही नाही. विद्यार्थ्यांसाठी पोहणे, ॲथलेटिक्स, क्रिकेट, विविध कला यांच्या शिक्षणाचीही सोय आहे. पुणे विद्यापीठ क्रिकेट संघातील श्री. कीर्तने व अन्य एक खेळाडूही याच महाविद्यालयाचे होत. दरवर्षी होणारे नृत्यनाट्यादी सांस्कृतिक कार्यक्रमही उत्तम दर्जाचे असतात. या महाविद्यालयाच्या कामातील अध्यापनविषयक असा हा एक भाग झाला. येथील अभ्यासक्रम पूर्ण करून पदवी घेतल्यानंतर विद्यार्थ्यांची नियुक्ती सेना, नौदल वा वायुसेनेच्या वैद्यकीय विभागात होते. मुंबई येथे आश्विनी हे नौदलाचे सर्वात मोठे रुग्णालय आहे. तर सिकंदराबादला वायुसेनेचे पहिल्या क्रमांकाचे रुग्णालय. त्या दोन्ही ठिकाणी त्या त्या दलांच्या विशिष्ट समस्यांवर आधारीत 'मरीन' व 'एव्हिएशन' मेडिसिनचा अभ्यास करावा लागतो. त्यानंतर मगच त्याना युनिट्समध्ये पाठविले जाते. लष्कराच्या (आर्मी) डॉक्टर्सना अधिक शिक्षण घेण्यासाठी कमांड हॉस्पिटलसमध्ये पाठविले जाते. अशा प्रकारे एकूण साडे चार वर्षे शिक्षण घेतल्यावरच विद्यार्थी आपल्या कामावर रुजू होतो. पण त्यामुळे त्याची किमान व्यावसायिक पात्रताही तितकीच वाढलेली असते.

पण सेनादलातील डॉक्टर्स, नर्सेस आणि त्यांच्या हाताखालचे–कमी शिकलेले सेवकाना शिक्षण देण्यासाठी काय करावे लागते? हजारो रंगीत चार्ट येथे बनविले जातात. ते शरीरविज्ञान आणि व्याधी अशा दोन्ही स्वतंत्र पद्धतीने तयार केले जातात. रेडियो–आयसेटोप्सचा वापर शिकविला जातो. तसेच रेडिएशनचे भयानक दुष्परिणाम दाखविणारे





अनुक्रमणिका

तक्तेही तयार होतात. फ्रॅक्चर्स, क्ष–किरणे हृद्–रोग, लीव्हर, व्हेनरल डीसीसेज (लैंगिक रोग) मानसिक विकृती, अति-थंड, अति–उष्ण, समशितोष्ण व सर्द-नरम हवामानात होणारे रोग, नारू, पटकी, टायफॉईड इत्यादी सर्वांना माहीत असणारे रोग यांचे हजारो चार्टस् व ग्राफ येथे नुस्ते तयारच केले जातात, असे नव्हे तर मागणीप्रमाणे ते इतर वैद्यकीय (अर्थात लष्करी) केन्द्राना पुरविले जातात. स्लाइड्स, सेरा, कल्चर्स जोपासून पाठविली जातात.

येथे डांस, चिलिटे, पिसवा मुद्दाम पैदा केल्या जाऊन वाढविल्या जातात. कारण बाहेरच्या डास पिसवांवर डी. डी. टी. किंवा अन्य नाशकांचे फवारे पडलेले असल्याने संशोधन वा अभ्यास यासाठी वैद्यकीय दृष्टया ते कीटक–निरुपयोगी ठरतात.

लहान मोठे उंदीर (रॅट व माईस) ससे, गिनी पिग्ज, माकडे व कुत्री एवढा शिकारखानाही येथे पाळलेला आहे. त्यात तीन चार मांजरे आहेत. तीही वेगवेगळ्या जातीची. शिवाय दक्षिणेत न आढळणारी अत्यंत भली दांडगी मेंढीही येथे पाळण्यात आलेली आहे. येथे बनविण्यात येणाऱ्या औषधांचे प्रयोग त्या प्राण्यांवर केले जातात. ते यशस्वी ठरले की मगच त्यांचा वापर होतो.

कोणतेही नवीन औषध किंवा नवीन उपचार प्रसिद्ध झाले की त्यांची चांचणी प्रथम येथील डॉक्टर्स वा सर्जन प्रत्यक्षात करतात आणि लष्करी पेशाला ते औषध वा तो उपचार उपयुक्त ठरला तरच ती माहिती सर्व लहानमोठ्या केन्द्राना पुरविली जाते.

आणखीही एक वैशिष्टय आहे. येथे "मोबाइल एपिडेमिक्स टीम" असे काही गट आहेत. देशात कोठेही लष्करी क्षेत्रात एकादी साथ प्रचंड प्रमाणावर सुरू झाली की, निघालेच, हे पथक तिकडे. तेथून ती मंडळी सर्व Data गोळा करून आणतात व लगेच अधिक संशोधन सुरू होते. सांगितलं तर हंसाल, पण बेडूक, किडे, मुंग्या, झुरळी इत्यादींना जिवंत पकडून आणण्याचेही शिक्षण दिले जाते.

येथे असलेल्या संग्रहालयात जगातील सर्व प्रकारच्या धान्यांचे नमुने आहेत, तसेच औषधी वनस्पतींचेही आहेत. बर्फ व हिम यामुळे होणाऱ्या विकारांचे संशोधन, त्यासाठी उपचार, वाळवंटातील विशिष्टय समस्या, त्या त्या ठिकाणी वापरावे लागणारे विशिष्ट प्रकारचे गणवेष या सर्वांचे संशोधन होते. तसेच लष्करी व नागरी वसाहतींची रचना आरोग्यशास्त्राचे दृष्टीने कशी असावी हेही येथे शिकविले जाते. येथे घ्यावे तेवढे शिक्षण व करावे तितके संशोधन अपुरेच आहे. अशी आहे ही "धन्वंतरी"ची वसाहत.

•••










# एकता-आज्ञांकिता

## ब्रिगेडियर एम. एस. ओबेरॉय

सैनिकी शिक्षण घेणे हे स्वतंत्र भारतातील प्रत्येक नागरिकाचे परम कर्तव्य आहे. आमच्या महाराष्ट्रात सैनिकी शिक्षण देणारे महाविद्यालय आहे ही शिक्षणसंस्था महाराष्ट्रात आहे खरी पण तिथं महाराष्ट्र नाही. अशा या संस्थेच्या जीवनाची ही माहिती....

**पौषातील** अखेरचा आठवडा. सकाळचे आठ वाजले होते, तरीही सिंहगडाच्या दऱ्याखोऱ्यातील धुक्याचे पटल तसेच रेंगाळत होते. तानाजीच्या रक्ताने पावन झालेला तो परिसर प्रसन्नतेने भारलेला होता. उज्वल भवितव्याची ग्वाहीच त्यातून मिळत होती. असे काय बरे घडत होते तेथे ? तेथे घडत होते एक शिल्प. होय, शिल्प. सजीव, सचेतन, सदृढ आणि सुबक अशा मूर्तींची जडण-घडण सुरू होती.

पहाटे साडेपाच वाजता विश्वकर्म्याने तेथील शिल्पी आणि शिल्पकार यांना, 'तस्मात् उत्तीष्ठ कौन्तेय' हा क्षत्रियाचा श्रीकृष्णाने सांगितलेला मंत्र, बिगुलांच्या निदानात एकवला होता. आणि सुमारे बारा हजारांची ती वस्ती एका झटक्यात पांघरुणाची उब दूर लोटून उभी ठाकली होती.

पुण्यापासून सुमारे २५ किलोमिटर अंतरावर राष्ट्रीय लष्करी अकादमीचा तो विस्तार सात हजार एकर भूमीवर आंखीव पद्धतीने पसरलेला होता. बारा हजार जीव सकाळी उठल्याबरोबर आणि रात्री निजतानाही सिंहगडाला साक्षी ठेऊन सामर्थ्य, धैर्य, आणि नीतिची संथा घेत होते. तिन्ही वर्षांचे मिळून १५०० छात्र, त्यांना आधुनिक लष्करी नेतृत्वाचे, शिस्तीचे, सामर्थ्याचे धडे देणारे गुरुजन, त्यांचा परिवार, मध्यम परंतु कणखर बांध्याचे दीडशे घोडे, तीन ग्लायडर्स, पोहोण्यासाठी उत्तम तलाव, तीन चार नौका, इत्यादि साऱ्या सजीव आणि निर्जिव वस्तूहि उद्यांचा सामर्थ्य संपन्न परंतु सहिष्णू असा भारत घडविण्यास सज्ज झाल्या होत्या.

### कदम कदम बढाये जा

खडकवासला येथे मराठी मुले अभावानेच आढळतात, ही रेकॉर्ड आता इतकी झिजली आहे की, ती फेकून देणेच योग्य होय. त्याचबरोबर तिथल्या जीवनाचे, शिक्षणाचे, आणि संस्कारांचे कुतूहल मात्र पूर्ण व्हावयाचेच आहे. खरंच मराठी विद्यार्थ्यांना खडकवासला झेपणार नाही का ? त्यांच्या आईवडिलांना पोरांसाठी पैसा खर्च करणे शक्य नसल्यास, अकादमीची दारे सदैव बंदच राहतील का ? लहान चणीच्या मराठी अंगलटीत अधिक कणखरता यावी म्हणून काहीच का प्रयत्न होत नाहीत ? एक ना दोन अनेक प्रश्न डोक्यात घोंगावू लागतात. आणि काहीशा भारावलेल्या दडपलेल्या मन:स्थितीतच दरवर्षी बोटावर मोजण्या-








इतकी मराठी मुले खांद्याला लटकावलेली प्रवासी बॅग, एका हातात छोटा हलका होल्डॉल व दुसऱ्या हातात सुटकेस घेऊन, अकादमीचा उंबरठा ओलांडतात. आणि . . . . . .

"अवघ्या सहा महिन्यातच त्यांचा तो भ्रमनिरास पूर्णपणे होतो. व मोठ्या आत्मविश्वासाने, जिद्दीने आणि आनंदाने, दोन देत आणि दोन घेत स्वभावाचे कानेकोपरे गुळगुळीत करीत 'कदम कदम बढाये जा, खूषीके गीत गायेजा, ये जिंदगी है कौम की, तो कौमपे लूटाये जा' या गाण्याने तेथील जीवनाशी समरस झालेले आढळतात. आणि थोड्याफार फरकाने सर्व पोरांची तशी मानसिक तयारी होते." हे सांगताना ब्रिगेडियर एम्. एस्. ओबेरॉय यांच्या उग्र रुबाबदार चेहऱ्यावर तसेच अंतःकरणाचा ठाव घेणाऱ्या नजरेतहि कर्तव्यनिष्ठ पित्याच्या कोमल अंतःकरणाची झाक झळाळून जाते. पन्नाशीच्या घरातील ओबेरॉय हे अकादमीचे डेप्युटी कमांडर होते. त्यानी अनेक देश, नाना प्रकारची सैन्ये, विविध लष्करी शिक्षण संस्था पाहिल्या आहेत—अभ्यासिल्याहि आहेत. तसेच युद्ध प्रसंगहि अनुभवले आहेत, हे त्यांच्या गणवेषावरील रिबिनींची पट्टी बजावून जाते.

## शिवरायांची ती प्रचिती

अकादमीचे नीट निरीक्षण करून तेथील जीवन आणि शिक्षण, संस्कार आणि वातावरण यांची रास्त कल्पना युवकांना देण्यासाठी दीपावलीचे प्रतिनिधि येणार असल्याची माहिती त्याना होती. म्हणूनच त्यांच्या कार्यालयात गेल्याबरोबर त्यानी समाधान अशासाठी व्यक्त केले की तेथील जीवनाविषयींचे विद्यार्थी-वर्गातील कुतुहल थोड्याफार प्रमाणात का होईना पूर्ण होईल.

आम्ही एकमेकांची ओळख करून घेईतो मेजर फडके येऊन दाखल झाले व अस्मादिकांची स्वारी मोठ्या खुषीत बाहेर पडली. सॅल्युट ठोकताना फडके यांच्या उजव्या मनगटातील पोलादी कडे माझ्या नजरेने टिपले होते. येथे येण्यापूर्वी ते तोफखान्यातील एका शीख तुकडीबरोबर काम करीत होते. त्यांच्या बदलीच्या वेळी बंधुत्वाचे प्रतिक म्हणून त्या युनिटने ते कडे यूनिटमधेच तयार करून त्याना दिले होते. त्याची ती माहिती ऐकताना मी साडेतीनशे वर्षे मागे गेलो. 'दोन अंतःकरणे एक झाली तर ती पर्वतहि भेदून जातील' ही छत्रपतींनी मिर्झाराजा जयसिंगाना सांगितलेली ममत्वाची प्रचिती इतक्या कालावधीनंतर का होईना पूर्णत्वास जात असल्याचे प्रत्यक्ष पाहिले. ऊर अनुभवाने दाटला.

## शिक्षण आणि जीवनविकास

अकादमीत एकाच वेळी एकूण सुमारे तीन' हजार विद्यार्थी असतात. वर्षातून दोन वेळा प्रवेश परीक्षा घेतली जाऊन जानेवारी ते मे व जुलै ते नोव्हेंबर अशा दोन टप्प्यात प्रत्येक वर्ष विभागले जाते. अभ्यासक्रमाचे वैशिष्टच हे की, 'सेना', 'नौ-सेना' व 'वायूसेना' या तिन्ही दलांच्या भावी अधिकाऱ्यांना पहिली दोन वर्षे एकत्रित शिक्षण दिले जाते. याचे कारण असे की, त्या तिन्ही दलांचे परस्पर सहकार्य असणे आवश्यक असल्याचा धडा दोस्त राष्ट्रे दुसऱ्या महायुद्धात शिकली. जर्मनी आणि जपान यांच्या पराभवाची जी काही प्रमुख कारणे आहेत त्यातील एक कारण असेहि झाले की : (अ) त्या तिन्ही दलातील अधिकाऱ्यांचे परस्परांच्या कार्यवैशिष्ट्याचे अज्ञान (ब) त्या अज्ञानामुळे आपल्याच विशिष्ट दलाविषयी निर्माण झालेला फाजील दुराभिमान. याचे एक ढोबळ उदाहरण द्यायचे तर असे सांगता येईल की, इंग्लंडच्या भूमीवर जर्मन सैन्य उतरविणे नाविक दृष्ट्या अशक्य असल्याचे नौदल-प्रमुख अॅडमिरल रेडर याने स्पष्टपणे बजावले होते. परंतु इंग्लंड बेचिराख करण्याची ताकद आपल्यात आहे अशी वल्गना करणारा विमानदल प्रमुख गोअरिंग याचा वदसल्ला आणि महायुद्धाच्या पहिल्या दीड वर्षात पोलंडपासून फ्रान्सपर्यंत युरोप चिरडून टाकणारे जर्मन लष्कर, ते कार्य नक्कीच पार पाडेल अशीच भूमिका हिटलरने घेऊन, त्या बाबतचा स्वतःचा दुराग्रह इतका ताणून धरला की तो शेवटी तुटला. ब्रिटनवरील प्रत्यक्ष तशी चढाई करण्याची योजना अखेर सोडून द्यावी लागली. तसेच जपानने आपल्या लष्करी मुसंडीला नौदल आणि हवाईदल यांचे सहकार्य सातत्याने देण्याची कधीच फिकीर केली नाही. परिणाम असा झाला की, पॅसिफिक आणि हिंदीमहासागरात अमेरिकन फौजा आणि विमानवाहिका यांचा तळ ठामपणे रोवला गेला. आणि जपानला निर्धाराने ठेचून काढण्यात अमेरिका अखेर यशस्वी झाली.

आशियातच काय पण साऱ्या जगात तिन्ही सर्व्हिसेसचे प्राथमिक शिक्षण देणारी ही एकमेव संस्था आहे, असे म्हणणे वस्तुस्थितीला धरूनच ठरेल.

शालांत परीक्षा उत्तीर्ण झालेल्या, साडे पंधरा ते सतरा वर्षाचे दरम्यानच्या मुलांना युनियन पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या लेखी स्पर्धा परीक्षेत उत्तीर्ण झाल्यानंतरहि प्रत्यक्ष अकादमीतर्फे घेतल्या जाणाऱ्या चाचणी व वैद्यकीय परीक्षेतहि यशस्वी व्हावे लागते. त्याच वेळी त्यांना आपल्या विशिष्ट दलाची निवड करण्याची मुभा दिली जाते. हे जरी खरे असले तरी तिन्ही दलांची वेगवेगळी गरज लक्षात घेऊन प्रत्येक अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्यांची संख्या ठरविली जाते. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर दर सहा महिन्यांनी सुरू होणाऱ्या नवीन अभ्यासक्रमासाठी लष्कर नौदल आणि वायुसेना यांच्या विद्यार्थ्यांचे प्रमाण बदलते असते. पहिली दोन वर्षे पूर्ण केल्यानंतर एखाद्या कॅडेटने अभ्यासक्रम बदलून मिळण्याची विनंती केली, तर एकंदर त्या संपूर्ण बॅचचे संतुलन न बिघडू देता, शक्य होत असल्यास त्याच्या विनंतीचा जरुर विचार होतो.

प्रत्येक टर्म पांच महिन्याची आणि पुढे एक महिन्याची सुट्टी अशा एकूण सहा टर्म्स होतात. सहाव्या टर्मच्या शेवटी तेथील शेवटची परीक्षा व दीक्षांत संचलन होते. त्यानंतर ते छात्र-विद्यार्थी लष्कर, नौदल आणि वायुदलाच्या खास शिक्षणासाठी त्या त्या ठिकाणी पाठविले जातात. आणि तिथे सुमारे दीड वर्ष शिक्षण घेतल्यावर त्यांना अधिकारपद मिळते. त्या भावी शिक्षणाची तरतूद म्हणून अकादमीच्या शेवटच्या दोन टर्म्समधे प्रत्येक विद्यार्थ्याला



अनुक्रमणिका

त्याच्या विशिष्ट दलाचे अधिक शिक्षण देण्यावर भर दिला जातो.

**परकीय भाषांचे शिक्षण**

प्रत्येक विद्यार्थ्याला इंग्रजी, हिंदी, सायन्स, मॅथेमॅटिक्स, मिलिट्री हिस्ट्री, मिलिट्री जॉग्रफी, इंजिनियरिंग ड्रॉईंग व सोशल सायन्सेस या विषयांवरोबरच रशियन, पर्शियन, तिबेटी, अरबी, फ्रेंच, जर्मन, किंवा चिनी भाषेपैकी एक भाषा सक्तीने शिकावीच लागते.

**शक्ति-युक्तीची सुरेख सांगड**

शरीर दणकट, लवचिक आणि जोम टिकवून धरणारे बनावे म्हणून नानाप्रकारचे व्यायाम करून घेतले जातात. दोराच्या सहाय्याने भित चढून जाणे, आपल्याहून अधिक वजनाच्या जोडीदाराला पाठीवर टाकून पळत जाणे; अत्यंत अरुंद व उंच लाकडी सांगाड्यावरून तोल न जाऊ देता सुमारे वीस पौंडाचे ओझे पाठीवर घेऊन चालणे, चाळीस पौंड वजनाची सागवानी बल्ली चारचौघांनी खांद्यावर टाकून पळत जाणे. पोहणे, अश्वारोहण, शिडाची नाव चालवणे, पोहणे, पूर्ण किट पाठीवर वांधून डोंगर-कडे चढणे, दहा दहा मैलांचा मार्च करत जाणे. असे अनेक प्रकारचे परिश्रम करून घेतले जातात. पूर्ण किट याचा अर्थ एकूण जवळपास ५६ पौंड ओझे होते. सर्वसामान्यपणे सैनिकाचा संपूर्ण बाडबिस्तरा व त्याची बंदूक याचे ते वजन होय. प्रत्यक्ष रणक्षेत्रावर मात्र वीसएक पौंड ओझे सैनिक वागवत असतात. हे सारे परिश्रम सकाळी नऊ वाजेपर्यंत करून घेतले जातात. त्याच्या जोडीला नेहमीची पी. टी, ड्रील आणि शस्त्रास्त्रे चालविणेही प्रत्येकाला शिकावेच लागते. एवढ्यानेच भागत नाही, तर सायंकाळी पोलो, हॉकी, क्रिकेट वगैरे पैकी कुठल्या ना कुठल्या खेळात सक्तीने भाग घ्यावा लागतोच.

विद्यार्थ्यांमधील सुप्त गुणांचा विकास व्हावा म्हणून आणि त्यांनाहि पहिल्यापासूनच जबाबदारी कळावी म्हणून प्रत्येक टर्मच्या विद्यार्थ्यांपैकी होतकरु मुलांना क्रमाक्रमाने अधिकार बहाल केले जातात. त्यामुळे स्वतःबरोबरच इतरांकडूनहि काम करून घेण्याची वृत्ति जोपासली जाते.

तसेच छंद म्हणून अनेक प्रकारचे जीवनोपयोगी शिक्षण घेण्याची व्यवस्था करण्यात येते. कलाकुसर, भारतीय व पाश्चात्य संगीत, सिनेक्लब, शिकार, नौकायन, मॉडेल्स बनविणे, ग्लायडिंग क्लब, जूडो, बॉक्सिग एक ना दोन अनेक छंदांची सोय तेथे आहे. जवळच असलेल्या सह्याद्रीच्या दरीकपारीमुळे गिर्यारोहणाचीही उत्तम सोय होते.

येथील प्रत्येक विद्यार्थ्याला सकस आहार मिळतो. सुमारे पाच हजार कॅलरीजचा तो खुराक असतो. दूध, चीज, अंडी, मटण व इतर पौष्टिक खाद्य पुरविले जाते. तेथील बॅन्क्वेट हॉल इतका मोठा आहे की एका वेळी १५०० लोक तेथे भोजन करू शकतात. अकादमीला लागणारी ब्रेड तेथेच तयार होते. स्वयंपाकासाठी बाष्प व विद्युत शक्तीचा वापर केला जातो. तेथे असलेला तो 'बॅन्क्वेट हॉल' दिल्लीच्या अशोक हॉटेलमधील बॅन्क्वेट हॉलपेक्षाही खूपच मोठा आहे. सकाळी "बेड-टी" खोलीतच दिला जातो. नाश्ता पाळीपाळीने ठराविक वेळात होतो. दोन्ही जेवणे मात्र एका ठराविक वेळातच घेतली जातात. पाश्चात्य पद्धतीचे टेबल मॅनर्सही शिकविले जातात. कारण तीच भोजनाची पद्धत जगातील सारे लष्करी अधिकारी पाळतात.

राहता राहिला आर्थिक प्रश्न. दरमहा तीनशे रुपयाहून कमी प्राप्ती असलेल्या पालकांच्या मुलांना पॉकेटमनी म्हणून आवश्यक असे तीस रुपये शिष्यवृत्तीचे रूपाने दिले जातात. त्यापेक्षा अधिक मासिक प्राप्ती असलेल्या पालकाना मात्र दरमहा तीस रुपये पाठवावे लागतात. आणि येथे लक्षात ठेवण्याची गोष्ट अशी की ती रक्कम कमांडरच्याच नावाने पाठवावी लागते. त्यामुळे मुलांचे हाती उधळपट्टीसाठी पैसा जाऊच शकत नाही. मात्र प्रवेशाचे वेळी गणवेष वगैरे खर्चासाठी प्रत्येक पालकाला काही किमान रक्कम भरावी लागते, भलेही त्याची प्राप्ती काहीही असो.

एखाद्या छात्राचा विशिष्ट विषय कच्चा असल्यास त्याच्या कडून दररोज नेमाने जादा अभ्यास करून घेतला जातो. तसेच शरीरसंपदा वाढण्यासाठी गरजेनुसार अधिक पौष्टिक आहारही दिला जातो.

**प्रशासनाची रुपरेखा**

तेथील सर्व विद्यार्थी तीन बटालियन्समधे विभागले जातात. प्रत्येक बटालियनची विभागणी डिव्हिजन, स्क्वॉड्रन व फ्लाईट अशा पोटविभागात केलेली असते. प्रत्येक फ्लाईटमधे ४०–४५ विद्यार्थी असतात. प्रत्येक स्क्वॉड्रनमधे तीन फ्लाईट्स् असतात. आणि तिन्ही दलातील विद्यार्थी असलेली ती एकेक फ्लाइट असते. प्रत्येक बटालियनचे एक स्वतंत्र वसतिगृह आहे. प्रत्येक केबिनमधे सर्व प्रकारची सुखसोय असते आणि दर केबिनमध्ये दोन विद्यार्थी असतात.

असे आहे खडकवासला अकादमीचे जीवन. "सर्विस बिफोर सेल्फ"–"सेवाच श्रेष्ठ" असे बिरुद सार्थ करण्यासाठी सर्व प्रकारचे शारीरिक, बौद्धिक व नैतिक शिक्षण दिले जाते. त्यातूनच उद्याचा सामर्थ्यसंपन्न, कर्तृत्ववान व नीतिमान अधिकारी निर्माण होण्यासाठी आवश्यक ती मनोभूमिका तयार होते. आणि म्हणूनच दर दीक्षांत संचलनानंतर निरोप घेण्यासाठी येणाऱ्या प्रत्येक छात्राचे अभिष्टचिंतन करताना तेथे त्यावेळी कमांडर असलेल्या वरिष्ठाचे अंतःकरण कृतकृत्यतेने ओतप्रोत भरलेले असते. तसेच ममतेची झालरही त्या निरोपाला कळत न कळत स्पर्शून जाते. ●●●












## एक प्रदीर्घ (अ) प्रीतिकथा

# अतृप्ता

–श्रीधर घैसास

एका शनिवारी संध्याकाळी मी जुहूला मित्राबरोबर बसलो होतो तेला हेमलसारखीच दिसणारी बाई पाहिल्याचा मला भास झाला. मी पुन्हा पुन्हा रोखून पाहात होतो. परंतु संधिप्रकाशात खात्रीपूर्वक सांगता येत नव्हते. कारण तशी ती बरीच लांब बसली होती. भास मात्र हेमलचाच होत होता. पण बरोबरचा माणूस अजयसारखा दिसत नव्हता. दुसराच कुणीतरी होता. कदाचित ती हेमल नसेलही, मी मनाशी म्हणालो.

तीन चार दिवसानी हेमल मला कुलाब्याला दिसली. बरोबर एक मैत्रीण आणि एक अनोळखी तरुण. यावेळी मात्र तिनं मला पाहिलं आणि हसत हसत ती माझ्याजवळ आली.

काय पत्ता कुठे आहे तुझा? तिनं मला विचारलं. जणू मीच कुठे तरी गेलो होतो अशा थाटात!

पूर्वी होतो तिथेच अजूनही आहे. तुला मात्र गरीब मित्राची आठवण राहिलेली दिसत नाही.

खरंच जमलं नाही रे. आम्ही उटीहून आलो आणि दुसऱ्याच दिवशी हा माझा बर्लीनमधला मित्र आला. तिनं त्या तरुणाची माझ्याशी ओळख करून दिली. सध्या दोन महिन्याच्या रजेवर इथे आलाय्. तेव्हा रोज कुठे तरी जाणं-येणं आणि शिवाय शॉपिंग वगैरे जोरात चालू आहे. ह्या दोन तीन दिवसात मात्र तुझ्याकडे नक्की येते. तिनं माझा निरोप घेत सांगितलं.

**अजय म्हणजे कुठल्याही सुंदर तरुणीच्या शिकारीला सहजासहजी बळी पडणारं सावज नव्हतं. पण ब्रिगेडियर सबनीसांच्या हेमलनं मात्र त्याला अक्षरशः वेडं केलं. ती सुद्धा त्याच्या बरोबर अगदी लग्नाच्या बायकोसारखी हिंडे–फिरे. अहो, फार कशाला ती दोघं उटीला पण जाऊन आली! पण पुढं काय झालं. अजयला हेमल मिळाली की वेड्यापिश्या अजय नंच तिला अव्हेरलं? तुमची उत्कंठा वाढविणाऱ्या सुदीर्घ कथेचा हा उत्तरार्ध.......**

आणि योगायोग म्हणजे मी ऑफिसमध्ये पोहोचलो तोच अजयचा फोन आला. कितीतरी दिवसानी...."हॅल्लो, काय साहेब? बरीच लवकर आठवण झाली आपल्याला. How you enjoyed your trip? Must be a great success! ' मी शेवटच्या शब्दावर जोर देऊन म्हणालो.

अं? हं...हं...नाही म्हणजे ठीक झाली......एकंदरीत! आजय थोडासा घुटमळत म्हणाला–बोलण्यात विशेष रस नसल्यासारखा.

काय रे घोडं कुठं पेंड खातंय? काहीतरी घोटाळा आहे. असं समजून मी विचारलं. आणि हेमलच्या बरोबर हा बर्लिनवाला कोण होता आज?

म्हणजे तूही बघितलास तर आज त्याला? तो तिचा बर्लिनमधला मित्र आहे. ती बर्लिनला होती ना दोन वर्षं? त्यावेळी त्यांची बरीच मैत्री होती म्हणे–जवळची! अजयनं सांगितलं. पुढच्या आठवड्यात दोघंही जयपूरला जाणार आहेत. मलाही आग्रह करीत होती दोघंजण. परंतु मला शक्य नाही असं मी सांगून टाकलं. अजय जरा कडवटपणानं म्हणाला.

तो बर्लिनवाला आला असला तर काय बिघडलं? मैत्री काय कोणाशीही असू शकते. आणि त्यात सुंदर, सुशिक्षित आणि बाहेरची हवा लागलेली तरुणी असेल तर ती कधीच असल्या गोष्टींचा विचार करीत नाही. यावरून तू भांडलास वगैरे नाहीना तिच्याशी? मी जरा साशंकतेनंच विचारलं. आणि आता तुमची काही नवीन ओळख नाही की त्यामुळे चटकन् गैरसमज होईल. दोघांचेही स्वभाव एकमेकाना पुरेपूर माहीत झाले झाले आहेत. प्रत्येकाला दुसऱ्याचे गुणदोष अगदी जवळून समजले आहेत. खरं की नाही? मी समजावणीच्या स्वरात विचारलं.

हं.....गुण आणि दोष.....दोन्हीही समजले आहेत... खरं आहे तू म्हणतोस ते. परत तो कडवटपणानं म्हणाला........ तिथंच सारं चुकलं. ते समजले नसते तर.....तो स्वतःशीच बोलत असल्यासारखा पुटपुटला......फारच बरं झालं असतं... खरोखरच चांगलं झालं असतं! जाऊ दे!........भेटूया लवकरच मला सवड झाली की, असं म्हणून झटकन् अजयनं फोन खाली ठेवला.

काय गोंधळ आहे याची मला काहीच कल्पना येईना. काही का असेना? त्यांचा ते निस्तरतील असं म्हणून मी माझ्या कामाला लागलो.

दोन दिवसानी एका संध्याकाळी हेमल माझ्याकडे आली.

काय भेटला की नाही अजय? आल्याबरोबर तिचा पहिला प्रश्न.

"ए, तुमची काय भानगड आहे? मला काहीही उमगत नाही हे कोडं" मी सांगून टाकलं.

कोडं वगैरे काही नाही....या सगळयाचं उत्तर उटकमंडच्या ट्रिपमध्ये दडलेलं आहे. आणि त्यात भरीला हा माझा बर्लिनचा मित्र! तोही कारणीभूत झालाय. इतक्या दिवसानी तो इथे आला आहे. गेले मी त्याच्याबरोबर कुठेतरी–फिरले मी थोडीशी, तर काय मोठं बिघडलं अजयचं? बरं आम्ही बाहेर जातो त्यावेळी अजयलाही येण्याबद्दल आवर्जून सांगते मी. पण त्याचा मत्सरी स्वभाव आड येतो ना!

हा माझा मित्र जर्मनीहून आला तेव्हा अजयला घेऊनच मी एरोड्रोमवर गेले होते. आम्ही इतक्या वर्षांनी भेटलो तेव्हा मला पाहिल्याबरोबर हस्तांदोलन करता करता त्यानं मला अगदी जवळ ओढलं. आता अजयचे आणि माझे संबंध त्याला कसे माहीत असणार?

"पण तुला जवळ ओढण्याइतके तुझे आणि त्याचे संबंध होते हे अजयला तरी कसं ठाऊक असणार? त्याचा काय अर्थ समजावा त्यानं?" मी तिला मध्येच फटकारले.

"पण एवढ्याशा गोष्टीवरून एकदम गैरसमज करून घ्यायचं ठरवलं तर कोण काय करणार?"

"बर्लिनमध्ये असताना तोच माझा एकमेव आणि जवळचा असा मित्र होता. परदेशात आपल्यावर खरोखरीची माया करणारा आणि आपल्यासाठी सर्वस्व वेचणारा असा कोणी तरी आपल्या पाठीशी उभा आहे ही भावनाच केवढी धीर देणारी असते स्त्रीला. या भावनेतूनच जिव्हाळा निर्माण झाला आणि त्यातूनच जवळीक निर्माण झाली तर काय चुकलं आमचं?"

"जवळीक?" मी पुन्हा खोदून विचारलं.

'जवळीक–ओढ–इंटरेस्ट किंवा आसक्ती–काहीही म्हण. पण त्याचा उमदा, निष्कपट आणि थोडाही मत्सरी नसलेला स्वभाव मला खरोखरच आवडला होता. तू त्याला परवा पाहिलाच आहेस. तेव्हा त्याच्याबद्दल मी अधिक काहीच सांगत नाही. तोही तरुण होता—माझ्यासाठी जीव टाकत होता–आणि मीही म्हातारी नव्हते.....तिनं खुलासा केला. तू त्याच्या जागी असनास त्यावेळेला तर असाच वागला असतास– जवळीकीनं! तेव्हा उगाचच या शब्दाचं अवडंबर माजवू नकोस.' तिनं रोखठोक मला सुनवलं.

"पण हे तू सर्व अजयला सांगितलं आहेस का? म्हणजे हे जवळीकीचं प्रकरण?"

"अगदी सर्व काही सांगितलं आहे उटीहून आल्यावर. ती








शांतपणे म्हणाली. "आणि इथेच अजयनं धसका घेतलाय! वास्तविक त्याच्या सारख्याला तरी असा धक्का बसू नये. निदान यापूर्वी स्त्रीचा अनुभव असलेल्या माणसाला!"

"कशावरून म्हणतेस असं?" मी मध्येच विचारलं.

यावर ती अगदी मोकळेपणानं हंसली.

"हे पहा, उगीच एकमेकांशी लपंडाव खेळण्यात काय अर्थ आहे? मी अजयच्या आयुष्यात येण्यापूर्वी तो "स्त्री" या विषयात संपूर्ण अनभिज्ञ होता असं तू तरी प्रामाणिकपणे सांगशील का? त्याचा अगदी जवळचा मित्र म्हणून विचारते. आणि ही गोष्ट तू नाकबूल करीत असलास तर मीच तुला काही जणींची नावं सांगते. मान्य आहे?"

आणि ती पुढं सांगू लागली.

"आता झालं गेलं गंगेला मिळालं या धोरणानंच मीही त्याच्याशी वागत होते. त्याचंही सर्व काही 'झालं–गेलं' विसरून! आता पूर्वीचं काहीही शिल्लक नाही हे दाखविण्याकरिताच मी अजयला जयपूरला चलण्याचं आग्रहानं आमंत्रण दिलं. पण तो येतच नाही त्याला मी तरी काय करू?" तिनं विचारलं.

"बरं हे एक मत्सरापोटी आहे असं मी म्हणेन–तो तुझा मित्र आला आणि हे सर्व झालं. हे एकदम कबूल. पण ते तुझं 'उटकमंडच्या ट्रिपमध्ये याचं उत्तर आहे' असं काहीतरी म्हणत होतीस त्याचं काय?" मी पुन्हा जुना धागा पकडीत विचारलं. आता मलाही तिच्या जीवनातल्या असल्या तत्वज्ञानात रस वाटू लागला होता.

पण माझ्या या प्रश्नावर तिनं असा काही चेहरा केला की माझ्या सर्व उत्सुकतेवर पाणी पडल्यासारखं झालं.

सांगावं की नको या संभ्रमात पडल्यासारखे तिच्या चेहेऱ्यावर भाव उमटले.

"नाही–म्हणजे तुझ्या मनात नसेल तर नको सांगू. हा ज्याचा त्याचा वैयक्तिक प्रश्न आहे. खरं म्हणजे इतकं खोदून मी तुला विचारायलाच नको होतं. जाऊं दे......" मी.

"तसं नाही रे. खरं म्हणजे तुलाच सांगू शकेन मी फक्त." ती म्हणाली. "ह्या गोष्टीची सुरवात तर तुझ्यापासूनच झाली आहे. पण कसं सांगू? तो तुझा अगदी जवळचा मित्र. तेव्हा त्याच्या बद्दल तुझ्याजवळ सुद्धा मी असं बोलणं, म्हणजे खरं म्हणशील तर योग्य नाही. आणि विशेषत: एखाद्या स्त्रीनं काही सांगणं म्हणजे तर...." आणि ती पुन्हा गप्प झाली..... "पण तू मला चांगली ओळखतोस. माझा स्वभाव आणि माझं मन–कोणताही ग्रह मनात न आणता तूच समजून घेऊ शकशील याची खात्री आहे मला. म्हणूनच सर्व काही सांगून टाकायचं ठरवलं आहे. निदान तू तरी माझ्याबद्दल काही गैरसमज करून घेणार नाहीस या विश्वासानंच."

आम्ही उटकमंडला कां गेलो होतो हे न समजण्याइतका तू भोळा नाहीस. दोघानाही जे हवं, हवं असं वाटत होतं ते मनमुराद मिळविण्यासाठी.....पण ते मिळवत असताना मिळत असताना.....कसं सांगू?....पण हे ....हे खरंच स्त्रीच्या तोंडी शोभणारं नाही त्याची कल्पना आहे मला. पण तो...म्हणजे माझ्यापेक्षा.....तो माझ्याहून.....नाही नाही....पण तो माझ्या दृष्टीनं.....खरंच कसं सांगू.....पण..... But he is no match for me! तिनं खाली पाहात अडखळत कसंबसं सांगून टाकलं. कृपा करून गैरसमज करून घेऊ नकोस. किंवा मला त्याची बदनामीही करावयाची नाही. पण मी सांगते ते अगदी खरं आहे.....अगदी मनापासून आहे–शंभर टक्के खरं आहे. परत तिनं निर्धारपूर्वक पण हळू आवाजात सांगितलं.

क्षणभर मी अवाक् होऊन तिच्याकडे पाहात राहिलो. तिच्या या वेफाट आणि छातीठोक विधानानं क्षणभर मीही गोंधळून गेलो. पण मनातल्या मनात स्वत:ला सावरीत थोड्या वेळानं मी प्रश्न केला,

"समज लग्न झाल्यानंतर तुला हा अनुभव आला असता तर काय केलं असतंस तू?"

"पदरी पडलं आणि पवित्र झालं" याच भावनेनं परंतु निष्ठेनं राहिले असते मी. खरंच राहिले असते. पण आता मात्र ते शक्य नाही.

"परंतु दुसरा जो कोणी तुझ्या आयुष्यात तुला पत्नी म्हणून स्वीकारील तो तरी पुरुषोत्तम असेल कशावरून? की त्याचीही परीक्षा घेणार......" मी मधेच वाक्य अर्धवट सोडले.

"मूर्खासारखे प्रश्न विचारू नकोस." तिनं मला चापलं. "कोणीही यावं आणि माझी अभिलाषा बाळगून मला जिंकावं इतकी मी रस्त्यावर पडलेली नाही. यापुढे लग्न करण्याचा विचार करीन तेव्हा त्या तरुणाला विशिष्ट मर्यादेतच ठेवीन मी! कारण माझं नशीब आणि भविष्य यापुढे अज्ञात असलेलंच बरं. जे नशीबात असेल ते चुकणार नाहीच. पण आता अजयशी लग्न मात्र नक्कीच नाही." ती खाली पाहात निर्धारपूर्वक म्हणाली.

"पण कसं शक्य आहे आता? म्हणजे इतकं सगळं घडल्यावर? आणि हे सर्व कसं सांगणार आहेस त्याला? दुखवून? की असामान्य भुकेची स्त्री म्हणून स्वत:ची त्याच्याजवळ जाहीरात करून, आणि पर्यायानं त्यालाच कमी लेखून? की त्याच्या भावनांचा–पौरुषाचा–सगळ्या सगळ्याचा अपमान करून?" मी उसळून विचारलं.

"हं........., त्याचाच विचार चाललाय हल्ली काही दिवस. हे सारं कसं सांगावं कसं समजावून द्यावं याच गोष्टीचा. कारण काहीही घडलं असलं तरी तो माझा उपकारकर्ता आहे. ज्या व्यवसायात शिरण्यास मी इतकी उत्सुक होते त्यात मला सहजासहजी अगदी शंभर टक्के यश मिळवून देण्यात तो तुझ्या इतकाच जबाबदार आहे. या क्षेत्रात त्यानं दिलेल्या सहकार्याचा






हात मला कधीच विसरता येणार नाही. आणि दुसऱ्या कशाचा जरी विसर पडला तरी त्यानं माझ्यावर केलेलं प्रामाणिक प्रेम मला कधीच विसरता येणार नाही. त्याचा मत्सर हा सुद्धा खऱ्या प्रेमातूनच निर्माण झाला आहे. हे सुद्धा मी जाणते. पण नुसत्या प्रेमानं किंवा पैशानं तरुण रक्ताची भूक भागत नाही हे निश्चित. आपलं नाणं आपण ओळखल्यानंतरही पुन्हा तेच चालवण्याचा प्रयत्न करून ते खणखणीत आहे अशी स्वतःचीच फसवणूक करून घेणं, हा मात्र मी मूर्खपणा समजते. आधी ते नाणं पारखावयास नको होतं पण ते पारखण्याचा मूर्खपणा माझ्या हातून झाला. तेव्हा आता तो निस्तरला तरच मी शहाणपणानं वागले असं माझं मन मला सांगेल? नाहीतर ही टोचणी मला जन्मभर खुपत राहील. छळत राहील. हे कसं करावं याचाच मी गेले काही दिवस विचार करतेय. कदाचित जयपूरहून येईपर्यंत काहीतरी मार्ग सुचेल....... पाहूया कसं काय जमतंय ते? मात्र कृपा करून अजयला काहीही सांगू नकोस. उटीला गेलो तेव्हापासूनच तो नर्व्हस् झालेला आहे." तिनं भीडभाड न ठेवता स्वच्छपणे सांगून टाकलं आणि ती उठली.

त्या रात्री खरं म्हणाल तर तिच्याबद्दलच विचार चालला होता. या बाईला कोणतं विशेषण लावावं याचा.......ॲबनॉर्मल की प्रामाणिक? निर्भीड की निर्लज्ज? मी स्वतःलाच प्रश्न विचारीत राहिलो.

त्यानंतर जवळ जवळ दीड-दोन महिने माझी कोणाशीच गाठ पडली नाही. अजय कंपनीच्या कामानिमित्त दूरवर गेला होता. आणि हेमलचा फोन आल्याशिवाय तिची काही माहिती कळण्याचा प्रश्नच नव्हता. कारण मीही विशेष उत्सुक नसल्यामुळे तिला फोन करण्याच्या भानगडीत पडलो नाही.

आणि त्या दिवशी अचानक हेमलचा फोन आला की आम्ही दोघंही येत आहोत म्हणून! अगदी गंभीर आवाजात. व त्यामुळेच मी थोडासा अस्वस्थ झालो होतो. आणखी काय काय ऐकायला मिळतंय या काळजीनं.

ठरल्याप्रमाणं दोघंही आली आणि त्यांना घेऊन मी बाहेर पडलो. वाळूत बसेपर्यंत तिघेही गप्प होती. शेवटी ही शांतता असह्य होऊन मीच सुरवात केली,

"काय विशेष बातमी आज?" मी अजयकडे पाहात म्हणालो-उगाचच हसल्यासारखे दाखवीत—

"माझ्याकडून काही नाही. पण हिनं मात्र आणली आहे." अजय कुत्सितपणानं म्हणाला. त्याच्या डोळ्यात तिरस्कार दिसत होता. आणि अगदी तुच्छतेनं तो तिच्याकडे पाहात होता.

हेमलनं मान खाली घातली आणि ती वाळूत फक्त रेघोट्या काढीत राहिली. अगदी मूकपणे. म्हणजे मला भेटण्यापूर्वी दोघांचं बरंच बोलणं झालं होतं तर. . .

"बोल ना! त्यात लपवण्यासारखं काय आहे आता?" पुन्हा अजयनं फटकारलं.



## गुरखा, पाऊस आणि झारी

**दार्जिलिंगचा पावसाळा. मुसळधार पाऊस कोसळत होता. जणू काय पृथ्वीला धुवून पुसून लख्ख करावयाचे मेघराजाने ठरविले होते. कर्नल निंबाळकर यांच्या पत्नी सौ. चपला त्या मुसळधार पावसाचा विजांच्या चमचमटाचा खेळ पहात बंगल्यातील व्हरांड्यात स्वेटर विणीत बसल्या होत्या.**

**इतक्यात व्हरांड्यातून बंगल्याचे आवारात जाणारे दार वाजले. सौ. निंबाळकरानी तेथे जे दृश्य पाहिले त्यामुळे त्याना हसावे की रागवावे वा कींव करावी हेच कळेना.**

**त्यांचा ऑर्डली गिरीबहादूर गुरुंग एका हातात छत्री व दुसऱ्या हाताने भरलेली झारी घेऊन बाहेर पडण्याच्या पवित्र्यात उभा होता..**

**"क्या है गिरीबहादूर"?**

**"कुछ नाही मेमसाब. . साबने बगीचे को पानी दालने कहा था. वही कर रहा हूं" एवढे उत्तर देऊन गिरीबहादूर तशा पावसात फुलझाडाना पाणी घालण्यास निघून गेला. बिचाऱ्या चपलाताई त्याच्याकडे पाहातच राहिल्या.**

**—जवानमर्द**

तिनं एकदा अजयकडे आणि माझ्याकडे पाहिलं आणि अगदी निर्धारपूर्वक एकेक शब्द उच्चारला. शांतपणे. . .

"तुला माहितच आहे की आम्ही लग्न करण्याचं ठरवलं आहे ते. आणि अजय आता साफ नाही म्हणतोय. माझ्या भवितव्याचा विचारही न करता. माझ्या असल्या परिस्थितीत. . ."

"परिस्थिती? कसली परिस्थिती?" मी गोंधळून विचारलं. .

"म्हणजे. . . म्हणजे हेमल तू..... हेमल तुला. . ."

"खरं आहे ते! मला दिवस गेले आहेत." तिनं शांतपणे कबुली दिली. "आणि मला या अवस्थेपर्यंत आणून वर तो खुशाल नकार देतोय." तिनं अजयकडे रोखून पाहात सांगितलं.

मी चमकून अजयकडे पाहिलं. अजूनहि त्याच्या डोळ्यात तोच तिरस्कार दिसत होता.

"खरं आहे ते" अजय तिच्यावरील आपली नजर जराही ढळू न देता म्हणाला. "तिच्या म्हणण्याप्रमाणे मी या गोष्टीला जबाबदार आहे म्हणून मीच तिच्याशी लग्न करावं. परंतु माझा या गोष्टीवर काडीमात्रही विश्वास नाही. किंबहुना याची जबाबदारी मी मुळीच घेऊ इच्छित नाही. जे उटीला घडलं तेच नंतरच्या काही दिवसात तसंच जयपूरलाही घडू शकतं! ह्यांचे जुने संबंध लक्षात घेतले, तर ह्यांच्या बाबतीत ते सहज शक्य आहे. आणि हिचा विशाल दृष्टिकोन, उदार अंतःकरण आणि सर्वांवर सारख्याच उत्कटतेनं प्रेम करण्याचं कसब पाहिलं म्हणजे हिला तर काहीच अशक्य नाही याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे.

"ही जरी जयपूरला गेली नसती तरीही हे अशक्य नव्हतं. कारण







'सन इन् सँड' हॉटेल सुद्धा याची साक्ष देईल ! जर तिला जयपूरला जाण्या आधीचा शनिवार आठवत असेल तर ! म्हणजे त्यावेळी हिला तेवढी शुद्ध राहिली असेल तर !" अजय रागाने पहात म्हणाला.

परत हेमलची मान खाली गेली. एकूण अजयने बाजी उलटवली होती.

"बोल, हेमल. गप्प राहून सुटणार नाही हे प्रकरण. तुझ्या आयुष्याचा प्रश्न आहे हा." मी जरा करड्या आवाजात म्हणालो.

जे मला वाटलं ते मी प्रामाणिकपणे सांगितलं. त्यातून तुझी मर्जी. मी थोडीच जबरदस्ती करू शकणार आहे तुझ्यावर? तिनं अजयकडे पाहात असहाय्यपणे प्रश्न केला.

हे पहा–मी माझी जबाबदारी टाळू पाहातोय असं मुळीच समजू नकोस हेमल. पण त्याला मीच जबाबदार आहे ही गोष्टच मला मान्य नाही. किंबहुना माझा यावर अजिबात विश्वास नाही. तू सांगतेस तसं ! तुला होणाऱ्या बाळाची शपथ घेऊन !

पुन्हा तिनं खाली मान घातली–निराश होऊन.

म्हणजे कुठे तरी खरंच वांधा होता. तिलाही ती गोष्ट सिद्ध करणे शक्य नाही अशी माझी खात्री होऊ लागली होती. म्हणूनच मी परत प्रश्नार्थक मुद्रेनं तिच्याकडे पाहू लागलो.

"ठीक आहे. असली गोष्ट सिद्ध करणं निदान माझ्यासारखीला तरी या प्रसंगात अशक्य आहे. मी कितीही जीव तोडून सांगितलं तरी तुम्ही खरं मानणार नाही याची खात्री आहे मला. आणि हे प्रकरण आणखी वाढवावं अशी माझीही इच्छा नाही. यात माझीच अब्रू चव्हाट्यावर येईल. कारण अब्रू फक्त स्त्रीचीच जाते नेहमी ! नशीबात होतं ते घडलं. किंबहुना आपणच घडवलं. पण पुढचं सर्व मलाच भोगलं पाहिजे. तिनं निर्धारपूर्वक सांगितलं. 'अजय' मी तुला बोलावलं, तेव्हा आज रात्री कसली तरी महत्वाची मीटींग होती असं तू म्हणत होतास. आता तू गेलास तरी चालेल. खरंच सांगते ! सगळा सोक्षमोक्ष आजच लागला ते बरं झालं. मी ह्याच्याबरोबर घरी जाईन.' हेमल माझ्याकडे पाहात म्हणाली. आणि स्वतःच उठली. तेव्हा आम्हालाही उठावे लागले. या सगळ्या प्रकरणाचा निकाल तिनं इतक्या तडकाफडकी लावला की हे घडतंय ते खरं की खोटं, यावर माझा विश्वासही बसेना. अजय थोडासा घुटमळला पण तिनंच त्याला Good Night विश् केलं.

मला खरोखरच जबाबदारी टाळावयाची नाही. पण......पण या बाबतीत There is other alternative left for me Hemal!! आणि असं म्हणून मान खाली घालून अजय झटक्यानं निघूनही गेला.

मी आणि हेमल तिथेच उभे राहून त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहात राहिलो. तो दिसेनासा होईपर्यंत. जे घडलं ते सत्य की स्वप्न हेच मला कळत नव्हतं.

चल. माझा दंड पकडून ती म्हणाली. मी चालू लागलो तिच्याबरोबर...........शेवटी न राहवून मीच तिला विचारलं,

काय ठरवलंस तू आता? तुझा मॉडेलिंगचा व्यवसाय काही महिने बंद. आणि तुला पिक्चरसाठीही ऑफर आल्याचं ऐकलं होतं पण काही महिने आता तरीही स्वीकारता येणार नाही. मी म्हटलं.

कां? प्रेग्नाव्हाईट किंवा तसल्याच एखाद्या प्रेगनन्सी-संबंधीच्या औषधांच्या जाहीरातीत राहीन की मी उभी. तिनं हसत हसत खुलासा केला.

या तिच्या वाक्यानं मी खरोखरच हादरलो. आणि एक क्षणभर तिच्याकडे पाहातच राहिलो. या क्षणालासुद्धा ती थंडपणानं स्वतःवरच विनोद करीत होती.

माझा चेहरा पाहाताच तिला हसू आवरेना. परत तिनं हसता, हसता वाळूत बैठक मारली आणि अगदी डोळ्यात पाणी येईपर्यंत ती हसतच राहिली. एखाद्या निर्लज्ज बाईसारखी. आता मात्र मला तिच्या या निगरगट्टपणाचा राग येऊ लागला होता. कदाचित् तिनं ते ओळखलं असावं, म्हणूनच मोठ्या कष्टानं हसू आवरीत ती सांगू लागली,

"शेवटी तूही माझ्यावर रागावलासच? रागाव बाबा. कुणीच माझ्या बाजूला नाही – कोणी मदतीलाही नाही, आणि त्यात तू सुद्धा रागावून बसला आहेस. मला वाटलं होतं–निदान तू तरी मला ओळखलं असशील."

"तसा माझा समज होता. आतापर्यंत तुझ्याबद्दल ! पण तुझा हा निर्लज्जपणा पाहिला आणि तुझ्याबद्दलचा विश्वास, अभिमान, कौतुक आणि तुझ्या मोकळेपणाविषयी असणारा थोडासा आदर हे सर्व काही साफ खलास झालं." मी स्पष्ट शब्दात कबुली दिली.

म्हणजेच माझी पारख करण्यात चुकलास. इथे हरलास ! तिनं मिष्किलपणानं विचारलं.

"मी हरण्याचा इथे काय संबंध आला, हेमल? ह्या भानगडीत हरलीस तू. अब्रू तुझी जाणार आहे. माझी नाही." मीच उलट तिला बजावले.

कसली अब्रू आणि कसलं काय घेऊन बसलायस? इथं अब्रूला खऱ्या अर्थानं जर धक्काच बसला नव्हता तर ती जाण्याचा प्रश्नच कुठे आला? ती कोडं घातल्यासारखी बोलली.

मी सुशिक्षित आहे. आणि शिवाय विचारानं वागणारी आहे हे तरी कबूल करशील का? मग माझ्या बाबतीत–एकदा हे गृहीत धरल्यावर, अशा तऱ्हेचं काही अनपेक्षित संकट माझ्यावर आलंच तर मी त्यात स्वतःला अडकवून घेईन का? तूच सांग– प्रत्येक सुशिक्षित स्त्रीला असल्या संकटात न सांपडण्याचा आणि सापडल्यावर बाहेर पडण्याचा मार्ग ठाऊक असतो. आणि माझ्यासारखी चार ठिकाणची हवा चाखलेली स्त्री तर यात कधीच अडकणार नाही? खरं की नाही?

अनुक्रमणिका






पण इतकं सगळं असूनही तू या वेळेला फसलीस आणि अडकलीस ना? मी परत प्रश्न केला.

हं.........ऐक आता. मी कुठल्याही संकटात सापडलेले नाही. जरी लग्नाआधी जे होऊ नये ते आमच्या हातून झालं असलं तरीही.........खरंच सांगते.

अजयच्या समोर मी फक्त कल्पनेनं सर्व काही उभं केलं. त्याच्या भावना मी जाणते म्हणूनच त्याला झिडकारणंही मला सर्वथा अशक्य होतं. त्याचं माझ्यावर असलेले उपकार आणि केलेलं खरंखुरं प्रेम मला लाथाडणं शक्यच नव्हतं त्याला दुखवून! तेव्हा विचारांती हाच मार्ग मला शिल्लक उरला होता. त्याच्याच गळचात पडून हे सर्व त्याचंच असल्याची शपथपूर्वक बतावणी करायची. मात्र त्यापूर्वी त्याला संशयाचा पूर्ण फायदा मिळेल अशी व्यवस्था करायची. नेमका त्याच वेळेला माझा हा मित्र येणार होता. तेव्हा संशयासाठी त्याचाच उपयोग करून घेण्याचं मी ठरविलं. त्याची माझी खरोखरच चांगली मैत्री होती. एरोड्रोमवर मुद्दाम हस्तांदोलन करीत असतानाच मी त्याच्याकडे ओढली गेले. ज्याला अजय मिठीत शिरल्यासारखे समजला ते इथंच घडलं! त्याच्याबरोबर फिरू लागले. मात्र अजयलाही दर वेळी बोलाविलं. मी अजयशीच प्रामाणिक आहे हे दाखविण्यासाठी. पण तो येणं शक्य नव्हतं. जयपूरही त्यातूनच निर्माण केलं. फक्त अजयला संशयाचा फायदा देण्यासाठी. त्यालाही आग्रहानं बोलावलं. आणि तुला खरं सांगू का – जयपूरला आमच्याबरोबर वडीलही होते माझे! असो. जयपूरला जाण्यापूर्वी मीच अजयला "सन न् सँड"मध्ये जातो आहोत. रुमचं रिझर्व्हेशन केलं आहे आणि तुला वेळ असला तर तूही ये म्हणून फोन केला. खरं म्हणशील तर आम्ही गेलोच नव्हतो. फक्त त्याचा संशय बळकट करण्यासाठी हे मला करावं लागलं.

तुला आठवत असेल तर तू मला—अजयला न दुखविता—त्याला कमीपणा न देता निर्णय घेण्यास सांगितलं होतंस. त्यासाठी मीच स्वतः अपराधी असल्याचं नाटक केलं. माझ्याकडे कमीपणा घेतला. स्वतःवर "तशा तऱ्हेच्या" स्त्रीचा शिक्का मारून घेतला. केवळ माझ्याबद्दल त्याच्या मनात तिरस्कार निर्माण होण्यासाठी—त्याचं माझ्यावरील प्रेम कमी करण्यासाठी! हीच वाई उठवळ आहे. माझं प्रेम मात्र शेवटपर्यंत खरं होतं, हेच त्याच्या मनात सतत टिकविण्यासाठी. आणि मला वाटतं मी त्यात शंभर टक्के यशस्वी झाले आहे.

अजय – आपण जबाबदार नाही—तेव्हा आपण हिला फसवलं नाही याच भावनेनं आणि समाधानानं निघून गेला. संशयाचा फायदा घेऊन आणि माझ्या असल्या परिस्थितीत खुशाल मला एकटीला टाकून!......ती हसत हसत म्हणाली.

नकळतच मी तिच्याकडे पाहात तिला हात जोडले आणि सरळ उठून तिच्या विरुद्ध दिशेला चालू लागलो—स्वतःशीच हसत!

●●●

## कै. गोपाळकृष्ण भोबे स्मारक निधी समिती

सुप्रसिद्ध मराठी लेखक, संगीतातले एक दर्दी जाणकार, चित्रकार आणि दीपावलीचे एक सहृद् कुटुंबिय श्री. गोपाळकृष्ण भोबे यांचे जांबावली येथे फेब्रुवारी १९६८ मध्ये दुःखद् निधन झाले. त्यामुळे त्यांच्या कुटुंबियावर तर दुःखाची कुऱ्हाड कोसळली आहे. अशा परिस्थितीत कै. भोबे यांच्या कुटुंबियाना आर्थिक सहाय्य करण्यासाठी म्हणून पद्मश्री वसंत देसाई यांच्या नेतृत्वाखाली एक समिती स्थापन करण्यात आली असून त्या समितीने प्रत्यक्ष कार्याला सुरुवातही केलेली आहे. या समितीमध्ये मुंबापुरीतील मान्यवर संस्था, साहित्यिक, चित्रकार, संगीतनट, गायक इत्यादी मंडळी सहभागी झाली आहेत. श्री. रा. वा. नायक व सौ. प्रफुल्ला डहाणूकर समितीच्या संयुक्त चिटणीस असून श्री. अरविंद पारेख व श्री. वामनराव देशपांडे खजिनदार म्हणून जबाबदारीने लक्ष घालणार आहेत.

ही कै. भोबे स्मारक निधी समिती संगीताचे कार्यक्रम ता. ४।५।६ मे रोजी सादर करणार आहे. याच वेळी एक स्मरणिका पण प्रकाशित करण्यात येणार आहे. स्मरणिका आणि निधी द्वारे जमा होणारी रक्कम व कै. भोबे यांच्या आप्त–मित्र–हितचिंतकांकडून लाभलेले आर्थिक सहाय्य एकत्रित करून त्यांच्या कुटुंबियाना देणार आहे.

आमच्या दीपावली कचेरीत कै. भोबे यांच्या निधनानंतर महाराष्ट्रातील व गोव्यातील अनेकांनी प्रत्यक्ष भेटून व कित्येकानी पत्रे पाठवून भोबे कुटुंबियाना आर्थिक सहाय्य देण्याची इच्छा प्रगट केली आहे. या सर्वांना आमची नम्र विनंती अशी की त्यांनी आपला निधी, **गोपाळकृष्ण भोबे स्मारक निधी समिती** या नावाने पुढील पैकी कोणत्याही एका कार्यालयाकडे ४ मे १९६८ च्या आंत पाठवावा.

(१) भोबे स्मारक निधि समितीः—जहांगिर आर्ट गॅलरी, म्युझियम कंपौंड, मुंबई १ (२) दि गोवा हिंदू असोसिएशन, लॅमिंग्टन रोड, गिरगांव मुंबई–४ (३) संपादक 'दीपावली', दीपावली कार्यालय ४०–४२ केनेडी ब्रिज, गिरगाव, मुंबई–४

दीपावली कचेरीकडे आलेला निधी मुख्य स्मारक निधीकडे पाठविला जाऊन त्याची रीतसर पावती पाठविली जाईल व त्यांची नावे दीपावलीत प्रसिद्ध केली जातील.

—संपादक 'दीपावली'








# मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध

-डॉ. भ. ग. कुंटे

सह-संपादक, महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका

## प्रास्ताविक

'युद्धस्य कथा रम्या' ही उक्ती सर्वांना परिचित आहेच. विशेषत: ऐतिहासिक व्यक्तींच्या पराक्रमांच्या कथांसारखी मन रमविणारी दुसरी गोष्ट नाही. विसाव्या शतकात लढली जाणारी युद्धे आणि इतिहास काळात लढली गेलेली युद्धे यात खूपच तफावत आहे. आजचे युद्ध देशव्यापी, भयंकर हानिकारक आणि ज्याचा शेवट काय होईल ते न सांगता येण्याजोगे असे असते. आजच्या युद्धात व्यक्तीला महत्व नाही असे म्हणता येणार नाही. किंबहुना अतिशय विध्वंसक आणि आधुनिक शस्त्रास्त्रांनी युक्त असलेल्या सेनेला एकाद्या मागासलेल्या राष्ट्राचे तितक्याशा संहारक नसलेल्या अशा शस्त्रांनी सज्ज असलेले सैनिक धूळ चारू शकतात याची प्रचीति आपल्याला गेल्या चाळीस वर्षांच्या काळात अनेकदा आलेली आहे. इतिहास काळातील युद्धे इतकी संहारक आणि इतक्या व्याप्तीने युक्त अशी नव्हती. त्या काळात आजच्या इतका अवाढव्य सेनासंभारही नव्हता आणि आजच्या इतकी मारक अणि विध्वंसक अशी शस्त्रेही नव्हती. ते जरी काहीही असले तरी ज्याला रणनीति म्हणतात ती रणनीति मात्र आजच्या आणि इतिहासाच्या कालखंडात एकच होती. युद्धोन्मुख राष्ट्राचे ध्येय शत्रूचा पराभव करणे हे असते. शत्रूला नामोहरम करण्याचे अनेक मार्ग असतात. ताकद असेल तर शत्रुबरोबर समोरा समोर झुंज देऊन त्याला नामोहरम करणे हा एक मार्ग अगर आपली ताकत कमकुवत असेल तर शत्रूला मिळेल त्या मार्गाने गनिमी काव्याचे युद्ध खेळून दे माय धरणीठाय करून सोडणे हा दुसरा मार्ग. या शतकात झालेल्या युद्धात या दोन्ही मार्गांचा अवलंब पक्षोपक्षांनी केला. ऐतिहासिक काळातही समोरासमोर युद्धे आणि गनिमी काव्याची युद्धे अनेक झाली.

## गनिमी कावा

गनिमी काव्याचे युद्धतंत्र मराठ्यांनी अंगिकारले आणि ते पूर्णत्वास नेले. शिवकालापासून तो मराठेशाहीचा ऱ्हास होईपर्यंतच्या जवळ जवळ २०० वर्षांच्या काळात काही पानपतासारखे अपवाद सोडून दिले तर मराठ्यांनी गनिमी काव्याच्या युद्धतंत्राचा अवलंब करूनच आपल्या शत्रूची हाडे खिळखिळी केली. या २०० वर्षांच्या कालखंडात आपल्या नजरेसमोर प्रामुख्याने उभा राहणारा कालावधि म्हणजे १६८९ ते १७०७ हा होय. विजापूर आणि गोवळकोंडा ह्या राज्यांचा पराभव करून मोगल सम्राट औरंगजेब हा मराठ्यांचा नाश करण्यासाठी आपल्या सर्व सामर्थ्यानिशी महाराष्ट्रात उतरला होता. छत्रपति शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रात प्रत्येक घराघरात पेटविलेली राष्ट्रप्रेमाची ज्वलंत ज्वाला विझवून टाकून महाराष्ट्राचा

ग्रास करण्याचा आणि साऱ्या हिंदुस्थानभर मोंगलांचे एकछत्री साम्राज्य निर्माण करण्याचा विडा त्याने उचलला होता. संभाजी-राजांनी छातीचा कोट करून २ वर्षे औरंगजेबाबरोबर झुंज दिली. परंतु औरंगजेबाच्या प्रचंड सामर्थ्यापुढे मराठ्यांचे सामर्थ्य तोकडे पडले. सारा महाराष्ट्र मोंगलांनी पायाखाली रगडला. संभाजीराजे मोंगलांचे कैदी बनले. औरंगजेबाने अतिशय क्रूरपणे त्यांचा वध केला. साऱ्या महाराष्ट्रभर अवकळेची सुतकी छाया पसरली. राजांवाचून राज्य पोरके झाले. मराठे नामोहरम झाले. आता शिवाजीराजांनी निर्मिलेले आणि जोपासलेले मराठी राज्य आपल्या हस्तगत झाले असे मनसुबे औरंगजेबाने रचले. मोंगलांच्या सेना मराठ्यांची राजधानी रायगडला वेढा देण्यासाठी जुल्फिकारखान नुस्रत जंग याच्या हाताखाली रवाना झाल्या. प्रसंग मोठा कठिण होता पण मराठी मन खचले नाही. सह्याद्रीचे उंच कडे पाठीशी घालून आणि छातीचा कोट करून स्वराज्याचे रक्षण करण्याची त्यांनी प्रतिज्ञा केली. परंतु महाराष्ट्राची दैन्यावस्था अजून संपली नव्हती. रायगडच्या बचावाची निश्चिती नव्हती आणि म्हणून येसूबाईने राजारामाला रायगड सोडून जिंजीकडे जाण्याचा आदेश दिला. मराठ्यांनी अशा तऱ्हेने गनिमी युद्धाच्या तंत्रातले पहिले पाऊल टाकले. शत्रूची शक्ति विभागणे आणि त्याचे लक्ष मुख्य युद्धभूमीपासून दूर नेणे हे उद्देश राजारामाच्या जिंजीकडे निघून जाण्यामुळे साध्य होणार होते. राजाराम गेल्यावर काही कालावधीतच रायगड पडला आणि रायगडावरील महाराष्ट्राचा बालराजा शाहू आणि महाराणी येसूबाई मोंगलांच्या हाती पडली. ज्याच्यावर मराठी माणसानी आपले आशास्थान केन्द्रीत केले होते तोच अशा रीतीने शत्रूच्या हाती पडल्यामुळे सारा महाराष्ट्र सुन्न झाला. शिवछत्रपतींनी लावलेला आणि जोपासलेला स्वराज्याचा कल्पवृक्ष इप्सित फळ देण्याअगोदरच खुडला जाणार की काय इतकी भयानक परिस्थिती निर्माण झाली. परंतु काळ आला होता पण वेळ आली नव्हती. छत्रपतींच्या वधामुळे आणि बालराजांच्या कैदेमुळे क्षणभर सुन्न झालेली मराठी माणसांची मने सूडाच्या भावनेने पेटून निघाली. औरंगजेबाचे सामर्थ्य अफाट होते. समोरासमोर औरंगजेबाशी सामना देण्याची हिंमत त्याना होती पण त्या लढचाची त्यांची तयारी नव्हती. औरंगजेबाबरोबर सामना कसा द्यावा आणि मोंगलांच्या लागलेल्या ग्रहणातून महाराष्ट्राची सुटका कशी करावी याची योजना राजाराम जिंजीकडे जाण्याचे अगोदरच त्याच्या आणि येसूबाईच्या मार्गदर्शनाखाली रामचंद्रपंत अमात्य, परशुरामपंत प्रतिनिधी, प्रल्हाद निराजी, संताजी घोरपडे, हणमंतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे, धनाजी जाधव आदि मुत्सद्दी सेनापति मंडळींनी मिळून पक्की केली. स्वराज्यातून मोंगल सैन्य बाहेर खेचणे, मद्रास प्रांतातील हिंदू सरदारांची संघटना घडवून आणणे आणि सैन्ये जमवून विजापूर व गोवळकोंडा ही राज्ये परत जिंकून घेणे हे राजारामाने आपले ब्रीदवाक्य ठरविले. [१]

( १ सरकारकृत औरंगजेब, खंड ५, पान ६३. )

**युद्धोन्मुख राष्ट्राचे ध्येय, शत्रूचा पराभव करणे, हे असते. मराठ्यांनी गनिमी कावा स्वीकारून ते साध्य करण्यासाठी सतत अठरा वर्षे दिलेल्या लढ्याचा हा चित्तथरारक आलेख....**

## युद्धाची सुरुवात

मराठ्यानी युद्धाचा पवित्रा टाकण्यासंबंधी घेतलेला हा निर्णय दोन्ही पक्षाच्या बळाची तुलना केल्यास किती योग्य होता हे समजून येईल. मराठ्यांची कुल फौज ७० ते ८० हजाराच्या घरात होती. यापैकी $\frac{१}{३}$ घोडदळ आणि $\frac{२}{३}$ पायदळ होते. या एकंदर फौजेपैकी निम्म्याहून अधिक फौज किल्लेकोटांचे रक्षण करण्यात गुंतली होती तर उरलेली सेनाप्रमुखांच्या हाताखाली सीमांचे रक्षण करण्यात, मोंगल सेनानीबरोबर धावपळीचे युद्ध करण्यात आणि मोगल प्रदेशात चढाई करून त्यांच्या ताब्यातील प्रदेशात धुमाकूळ घालण्यास नियुक्त होती. मराठ्यांच्या फौजात तोफखाना जवळ जवळ नव्हताच. हत्तीसारखे वाहन मराठ्याना परवडण्यासारखे नव्हते आणि बंदुकची आणि बर्कंदाज यांचा समावेश त्यांच्या पायदळी आणि घोडदळी सेनाविभागात झालेला होता. मराठा शिपायाची शस्त्रे भाला, बरची, तलवार यासारखी होती. हल्लीच्या युद्ध परिभाषेत मराठ्यांची फौज 'लाईट' (Light) या सदरात मोडणारी आणि उत्कृष्ट 'मोबिलिटी' (Mobility) असलेली अशी होती. मराठ्यांच्या सेनासंभाराशी तुलना करता मोंगलांची युद्धसज्जता अवाढव्य होती. मोगलांचा कुल सेनासंभार २ लाखापर्यंत असून बाजारबुणगे धरले तर मोंगलांचा कुल जमाव ४ लाखापर्यंत होता. खड्या फौजेत ४० ते ५० हजार घोडेस्वार असून उरलेले पायदळी सैनिक होते. त्याशिवाय लढाऊ हत्ती आणि उंटांच्या वेगळ्या तुकड्या मोंगल फौजेत होत्या. त्याशिवाय मालवाहू हजारो जनावरे होती ती वेगळीच. मोंगलांचा तोफखाना सुसज्ज असून तरबियतखानासारखा नामवंत अधिकारी तोफखान्याचा प्रमुख–मिर आतिश–होता. हल्लीच्या परिभाषेत ज्यांना सॅपर्स (Sappers) आणि माईनर्स (Miners) म्हणता येईल त्यांची पायदळी सेनाविभागात भरती होती. मोंगलांची फौज इतकी प्रचंड असूनही कोणाही मोंगल सेनानीच्या हाताखाली एकावेळी १० ते १५ हजारापेक्षा जास्त सैनिक असल्याचे आपणास आढळत नाही. त्यामुळे मराठ्यांशी तुलना करता मोगल फौजा 'हेव्हिली लेडन' (Heavily Laden) आणि इम्मोबाईल (Immobile) अशा होत्या. अशा परिस्थितीत प्रल्हाद निराजीचा आदेश "सत्वर कर्नाटकास जावे आणि निरलसपणे स्वराज्य रक्षणाचा प्रयत्न करावा" आणि येसूबाईने दिलेला सल्ला "किंवा शत्रूचे प्राबल्य विशेष त्या अर्थी चंदीचंदावर प्रांती दम खाऊन पुन्हा मसलत वळवून राज्यसाधनही करणे पडेल तरी करावे" या गोष्टी मराठ्यांच्या










अनुक्रमणिका




## मैलाचा तो दगड

दुसऱ्या महायुद्धाचे वेळी महू येथे किंग्ज कमिशनसाठी ऑफिसर्स ट्रेनिंग सेंटर होते. तेथील कॅडेट्सना बराकीपासून एका विवक्षित ठिकाणी सकाळी एकत्रित जमावे लागत असे. तेथून मग सर्व मैदानी लष्करी शिक्षणासाठी सर्वजणांच्या तुकड्या रवाना होत असत. ते ठिकाणी बराकीपासून अडीच मैलावर होते.

दररोज पहाटे तेथपर्यंत जाणे भागच होते. आणि त्या ठिकाणी महू–नीमच रोडवरील मैल–निदर्शक दगड होता. एका कॅडेटला वाटले, ही काय साली रोजची कटकट ? त्यापेक्षा तो विशिष्ट दगडच येथे (बराकीपाशी) आणून पुरणे अधिक योग्य नव्हे काय ? झाले. ती कल्पना त्याने आपल्या काही खास दोस्तानाही सांगितली.

त्या गोष्टीनंतर दुसऱ्याच दिवशी पहाटे 'फॉल इन'चा इशारा झाला व अडीच मैलांची तंगडतोड वाचली याचा आनंदही (!) काही कॅडेट्सना झाला. परंतु त्यांचा इन्स्ट्रक्टर सार्जंट मेजर ग्रीन हा नावाने ग्रीन परंतु अनुभवाने जून बनलेला होता. तो विशिष्ट दगड व त्यापाशी उभे राहिलेले कॅडेट्स त्याने एकवार पाहिले.

नंतर तो म्हणाला 'दगड येथे आणण्याची शक्कल खरोखरच मामी. परंतु दगडापाठोपाठ परेड ग्राउंडचे ते विशिष्ट ठिकाणही आणले असते तर बरे झाले असते नाही?' आणि दुसऱ्या क्षणी ती तुकडी मुकाट्याने रोजची अडीच मैलांची तंगडतोड करू लागली.

—जवानमर्द

युद्धनितीची कल्पना देण्यास पुरेशा होतील. मराठ्यांनी टाकलेल्या या फसव्या पवित्र्याला औरंगजेबासारखा कसलेला सेनानी कसा बळी पडला याला इतिहासाची साक्ष आहेच. त्या घटनांकडे वळण्याचे अगोदर औरंगजेबाची युद्धनीति काय होती याची थोडीशी कल्पना करणे जरूर आहे. औरंगजेबाचा मुख्य रोख मराठ्यांच्या किल्ल्यांवर होता. किल्ले हा मराठ्यांचा मानबिंदू आणि मर्मबिंदू आहे अशी त्याची समजूत होती आणि हे किल्ले हाती आले की मराठ्यांचा प्रतिकार पत्त्यांच्या बंगल्यासारखा ढासळून पडेल अशी त्याची समजूत होती. त्याचप्रमाणे मराठ्यांचे सर्व शक्तीस्थान म्हणजे त्यांचा राजा आणि त्याचा काटा काढला की मराठे नामोहरम होतील अशीही औरंगजेबाने कल्पना करून घेतली होती. संभाजीचा आपण वध केला आहेच, शाहूराजा आपल्या हाती सापडलेलाच आहे, आता फक्त राजारामाचा निकाल लावणेच बाकी आहे आणि तेवढे केले की दक्षिणेमधील आपले कार्य आटोपले. हे कार्य आपण चुटकीसारखे आटोपून उत्तरेत जाण्यासाठी मोकळे होऊ असा त्याला दृढ विश्वास होता. त्या हेतूनेच त्याने आपल्या एका सेनाविभागाला किल्लेकोट घेण्याच्या कामावर रवाना केले आणि दुसऱ्या सेनाविभागाला राजारामाच्या पाठीवर जिंजीकडे रवाना केले.

लष्करी डावपेचाच्या दृष्टिकोनातून औरंगजेबाने पहिली चूक केली ती इथेच. याठिकाणी छत्रपति शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत मिर्झा राजा जयसिंग ह्या मोगल सेनापतीने जे डावपेच टाकले त्याचीच पुनरावृत्ति औरंगजेबाने केली असती–म्हणजे स्वराज्याच्या मुलुखातच आपल्या प्रचंड सैन्यानिशी तळ देऊन बसणे व आपल्या अधिकाऱ्याकरवी मुलुखाचा कारभार हाती घेणे–तर मराठ्यांचा प्रतिकार केव्हाच कोसळून पडला असता. औरंगजेबाने आपले निम्मे सैन्य राजारामाच्या पाठीवर लावून देऊन युद्धभूमीमधील (Theatre of War) आपली ताकद कमी करून घेतली आणि किल्ले घेण्याच्या फंदात आपले बहुतेक सैन्यबळ अडकवून ठेवून मराठ्याना सरहद्दीवर आणि मोंगल प्रदेशात धुमाकूळ घालण्यास आयती संधि दिली. किंबहुना मराठा मनाची घडणच औरंगजेबाला समजली नाही. कारण छत्रपति गेला किंवा कैद झाला म्हणून कमकुवत होणारे मन मराठा माणसाजवळ नव्हते. उलट आपल्या देशावर स्वराज्यावर स्वारी करणाऱ्या परकीयाला हाकलून देण्याची जिद्द त्यांनी बाळगली. त्यासाठी अविरत लढा द्यावा लागला आणि सर्वस्व पणाला लावावे लागले तरी त्याची तयारी त्यांनी ठेवली. छत्रपति शिवाजी महाराज आणि संभाजीराजे यांच्या तालमीत तयार झालेली पिढी स्वराज्याच्या रक्षणासाठी कंबर कसून पुढे सरसावली आणि चुटकीसारखी दक्षिणेतील लढा संपविण्याची ईर्ष्या बाळगलेल्या औरंगजेबाला १८ वर्षे सतत झुंज द्यावयास लावून नामोरहम केले.

अशा तऱ्हेने मोगल मराठा संघर्षाला मोठ्या धडाक्याने सुरुवात झाली. रामचंद्रपंत अमात्य यांनी सेनाधिकाऱ्यांना आज्ञा केली की "पोख्तीच्या जमावे स्वारीशिकारी करून जे गड गनिमाने घेतले ते हिरावून हस्तगत करणे. गनिमांची ठाणी जागजागा असतील ती कुल मारून काढणे" या आज्ञेप्रमाणे संताजी घोरपडे हा संभाजी राजाना पकडणाऱ्या शेख निजाम उर्फ मुकदवरखान याजवर कोल्हापूरच्या परिसरात चालून गेला आणि शंकराजी नारायण याने दक्षिण कोकणातल्या मोंगल ठाण्यावर हल्ला करण्यासाठी कूच केले. या संघर्षाची अतिशय यथातथ्य वर्णने केशव पंडित याने आपल्या राजाराम चरितम्‌ या काव्य-ग्रंथात केली आहेत. तो म्हणतो "नंतर निजामाला शासन करण्यासाठी महाबलवान संताजी घोरपडे व वीरमान्य व वीर श्रेष्ठ धनाजी जाधव यास आज्ञा केली. निजामाला जिंकण्यासाठीपाठविलेल्या संताजी घोरपड्यादिकानी प्रथम निजामाचा पराभव करून नंतर त्याचे हत्ती, घोडे व पुष्कळ द्रव्य हरण केले. तेव्हां सर्व ऐश्वर्याचा नाश झाला आहे व सर्वांगावर शस्त्रांच्या जखमा झाल्या आहेत असा तो खल कसाबसा जीव वाचवून पर्वताच्या पायथ्याशी वसलेल्या करवीरास गेला." शंकराजीने तर आपल्या शौर्याची कमालच केली. केशव पंडित म्हणतो "नंतर तो श्री.







सचिव प्रभू आपल्या षड्‌विध सैन्यासह प्रस्थान करता झाला. तो महिपत गडावरून[1] संगमेश्वराला गेला. तेथे युद्धात अजिंक्य अशा प्रबल म्लेंच्छ सेनापतीला त्याने पराजित केले. शृंगारपूर-निवासी युद्धलालसी भाररायमुखी[2] चोराना बंदीत टाकून तो सत्वर गुणवंतगडाला[3] गेला. तो गड काबीज केला. नंतर सुंदरगड[4] वश केला. त्याचप्रमाणे "दंतपाटणच्या[5] राजाला जिंकून पायदळासह वसंतदुर्गला[6] गेला." इ. स. १६९० मध्येही मराठ्यानी मोंगलांची अनेक ठाणी जिंकून घेतली. जेध्यानी रोहिडा घेतला. खुद्द रामचंद्रपंताने प्रतापगड आणि वाई ही मोंगल ठाणी उधळून लावून त्यावर आपला कबजा केला. संभाजी राजांचा मृत्यू, शाहूची कैद आणि राजारामाचे जिंजीला प्रयाण या घटनामुळे राज्यात थोडेसे अस्थिरतेचे वातावरण निर्माण झालेले होते. मोगलांबरोबर सातत्याने युद्ध खेळताना प्रजाजनांचे मनोधैर्य टिकवून धरणे अवश्य होते. राजाराम छत्रपतीच्या वतीने रामचन्द्रपंताने वतनदाराना आश्वासन दिले की "जो कोणी वतनदार एकनिष्ठा धरून येईल, गडकोट हस्तगत करून देईल, या राजाचे ठायी दृढनिष्ठा धरील आणि स्वामीकार्य करून देईल त्यास इसाफती व वतनभाग चालिला असेल तेणेप्रमाणे दुमाला करून लिहोन पाठविणे. सनद सादर होईल तेणेप्रमाणे मनुस असे"[7] याप्रमाणे हल्लीच्या परिभाषेत (Home Front) होम फ्रंट म्हणता येईल अशा घरच्या आघाडीचा सांभाळ रामचंद्र पंताने केला तर वॉर फ्रंट (War Front) म्हणजे युद्ध आघाडी संताजी-धनाजी या शिवाजीराजांच्या तालमीत तयार झालेल्या कसलेल्या सेनानीनी संभाळली.

## संताजीचे पराक्रम

या काळातील संताजीचे पराक्रम काळालाहि भय वाटावयास लावतील असे होते. कसल्या तरी दुर्दम्य आशावादाने त्याने आपल्या सैनिकांची मने भारावून टाकली होती. मृत्यूची भीति त्यांनी कधीच टाकून दिली होती. ज्यांनी ज्यांनी संताजी विरुद्ध शस्त्र उपसले त्या सर्वांचा त्याने निःपात केला, त्यांचे सर्वस्व हरण केले आणि नेसत्या वस्त्रानिशी त्यांना औरंगजेबाकडे पाठवून दिले. आकाशात वीज तळपते एकीकडे, मेघांची घनगर्जना आणि गडगडाट ऐकू येतात दुसरीकडे तर अस्मानातल्या तळपत्या तलवारीचा प्रहार बसतो तिसरीकडे–अगदी असेच संताजीचे झाले. आज दक्षिण महाराष्ट्रात घोडदौड करणाऱ्या संताजीची झेप उद्या उत्तर महाराष्ट्रात पडते तर परवा त्याचा जरीपटका मोठ्या डौलाने तामिळनाडात फडकू लागतो. संताजीने पहिली धडक औरंगजेबाचे पहिल्या दर्जाचे सरदार जाननिसारखान आणि तहब्बुरखान याना दिली. त्यांची सगळी फौज, सामग्री आणि तोफखाना त्याने गारद केला. दोघे सरदार जखमी होऊन मोठ्या मुष्किलीने रणांगणातून निसटले. औरंगजेबाला जेव्हा ही बातमी कळली तेव्हा अत्यंत कष्टी होऊन तो म्हणाला, "माणसांच्या हातात काही नाही. सर्व परमेश्वराकडून घडते." गनिमी काव्याच्या युद्धात ज्याला Surprise attack म्हणजे शत्रूवर अचानक हल्ला करून त्याला चकित करून सोडणे म्हणतात. त्या मार्गाबरोबरच संताजीने मोठ्या धाडसाने अनेक वेळा प्रचंड मोंगली सैन्याबरोबर समोरासमोर सामना देऊन अनेक मोंगल सरदारांना पाणी पाजले. गनिमी काव्याच्या युद्धात प्रत्येक व्यक्ति ही पुढारी होते आणि सेनानी हा इतर सैनिकांसारखाच शत्रूवरील हल्ल्यात प्रामुख्याने भाग घेतो. संताजीची शिस्त आणि लष्करी बाणा जरी कडक होता तरी सैनिकाबरोबर मिळून मिसळून तो वागत असल्याने त्याच्यावर त्याच्या सैनिकांचे जीवापाड प्रेम होते. आपल्या सैनिकांच्या खांद्याला खांदा भिडवून तो त्वेषाने लढत असे आणि शत्रूसैनिकाची शिरकमले रणभूमीला अर्पण करीत. त्याचे खड्ग रणांगणात तळपत असे. असाच एक प्रसंग १६९० च्या मे महिन्यात घडून आला.

## रुस्तुमखानाचा पराभव

मोंगल सरदार रुस्तुमखान हा विजापुरी साताऱ्याचा किल्ला जिंकून घेण्याचे हेतूने किल्ल्याजवळ येऊन पोहोचला होता. संताजी घोरपडे, आणि धनाजी जाधव यांनी प्रचंड सैन्यासहित त्याच्यावर चाल केली. मराठ्यांच्या फौजेतील बर्कंदाजानी मोंगलांच्या आघाडीवर असलेल्या हत्तींच्या तुकडीवर गोळ्यांचा वर्षाव केला. हत्ती परत फिरले आणि अनेक मोंगल सैनिक हत्तीच्या पायाखाली सापडून ठार झाले. हे बघितल्यावर रुस्तुमखान त्वेषाने पुढे घुसला पण बाणांच्या आणि बंदुकीच्या गोळ्यांनी झालेल्या जखमानी तो आपल्या हत्तीवरून

ऑर्डर्स ऑफ द डे

सामने देख!

१ विशालगडाच्या उत्तरेस सुमारे पंधरा मैल

२ भालेराई. लुटालूट करणारे

३ पाटणच्या नैऋत्येस सुमारे दहा मैल

४ पाटणच्या पश्चिमेस सुमारे तीन मैल

५ साताऱ्याच्या दक्षिणेस सुमारे पंचवीस मैल

६ कऱ्हाडच्या वायव्येस सुमारे आठ मैल

७ राजवाडे खंड १५, पान ३७६.

खाली पडला. मराठ्यानी त्याला कैद केले, त्याची सर्व संपत्ती आणि मालमत्ता त्यांनी लुटली. रुस्तुमखानापुढे संताजीची अजीजी करण्यावांचून मार्ग उरला नाही. १,००,००० होन खंडणीदाखल देण्याचे कबूल करून त्याने आपली सुटका करून घेतली. या लढाईची आणि स्वराज्यामधे सर्व दूर पसरलेल्या मराठा सेनानींनी मोंगलाना कसे जेरीस आणले होते याची मनोरंजक हकीकत पुढील ऐतिहासिक लेखात आपल्याला वाचावयास मिळते. "रुस्तुमखान सातारे खाली वेढा घालून बैसले होते. त्यावरी गनीम संताजी घोरपडा व धनाजी जाधव निस्वत राजाराम भोसले यांनी स्वारी करून लढाई झाली. खाने आजमची फौज कुल बुडविली. वरी गनीम वाईस गेले. वाईचा किल्ला पाडून टाकिले. . . . जागजागची ठाणी होती ती घेतली. . . . गनीम वंदना खाली येऊन राहिले. . . बुधीचे फौजदार खुदावंदखान व सिद्दी हिलालखान परगणे खटाव होते. गनिमाची खबर ऐकोन ठाणी टाकोन निघोन गेले. . . कित्येक मस्तासरा रयेता घरून किल्लेवर घातले. कोट पाडीत होते इतकिया-मधे खबर आली की मरामयतखान वगैरे पादशाही फौजा मसुराहून औंवास आले म्हणोन ऐकोन कोट पाडीत होते ते नैरास गेले. नैरीहून फौज उठोन अवंधास पादशाही फौजेवरी मुकावलेस गेले. . . कसबे मजुकुरास वेढा घालून भांडो लागले. . . बारा दिवस वेढा घातला होता" वगैरे वगैरे[१]. शत्रूवर अनेक ठिकाणी हल्ले करून त्याला अशा रितीने जेरीस आणण्याचे तंत्र मराठ्यानी याप्रमाणे आत्मसात केले. समोरासमोर सामना देणाऱ्या शत्रूची ताकद अजमावून त्याप्रमाणे बचावाची अगर चढाईची लढाई खेळता येते. परंतु मारा, झोडा आणि परत फिरा या तंत्राचा अवलंब करणाऱ्या मराठ्याना तोंड देणे त्याकाळी औरंगजेबाला कठिण गेले असल्यास त्यात नवल ते काय ! मराठ्यांच्या मोंगलाविरुद्ध हालचाली केवळ पुणे सातान्यापुरत्याच मर्यादित नव्हत्या. खुद्द मोंगलांच्या ताब्यातील प्रदेशात घुसून त्यांची ठाणी लुटण्याचे धाडस त्यांनी दाखविले. १६९० मधे तर औरंगाबादच्या भागात आक्रमण करून उत्तरेकडून औरंगजेबाला येणारी रसद आणि खजिना अडविण्याचा प्रयत्न केल्याचे भीमसेन सक्सेना हा आपल्या तारिखे दिल्कुषा या फारसी ग्रंथात सांगतो. मराठ्यानी गनिमी युद्धाचा जो पवित्रा घेतला होता त्याची व्याप्ती आणि परिणाम यांची कल्पना मोंगलाना कधीच समजू शकली नाहीत. इतकेच काय परंतु मोंगल मराठा संघर्षाची माहिती देणारे भीमसेन सक्सेना[२] (तारिखे दिल्कुषा), साकी मुस्तैदखान[३] (मासिरी आलमगिरी), ईश्वरदास नागर[४] (फुतुहाते आलमगिरी), खाफीखान[५] (मुन्तखा-बुल्लुबाव) वगैरे जे तत्कालिन इतिहासकार आहेत त्यांनाही गनिमी युद्धनितीचे खरे मर्म कळले नाही. मोंगल-मराठा संघर्षाची वर्णने देताना प्रत्येकजण मोठ्या हिरिरीने सांगतो की मराठ्यांचा अनेकवेळा पराभव झाला आणि त्यांना पिटाळून लावण्यात आले. परंतु प्रश्न असा पडतो की एकदा पिटाळून लावलेली मराठ्यांची पथके पुन्हा एकत्र येऊन मोंगलावर हल्ला चढवतात कशी ? याचा अर्थच असा की मोंगलांवर हल्ला करावयाचा, मोंगल सैनिक सावध होऊन प्रतिहल्ला करण्याची तयारी करीपर्यंत यथास्थित हात मारावयाचा आणि आता प्रतिहल्ला होणार असे दिसताच पळ काढावयाचा. हाच खाक्या मराठ्यानी स्वीकारला होता. मराठ्यांच्या ह्या हल्ल्याला तोंड देण्यासाठी औरंगजेबाच्या सेना जुल्फिकारखान नुस्रत-जंग, असदखान, शहाजादा आज्जम, वेदारवख्त, गाजिउद्दीन फीरोज-जंग वगैरे सेनापतींच्या हाताखाली स्वराज्यात आणि स्वराज्या-बाहेर पसरल्या होता. या संघर्षाचा वृत्तान्त आणि विरोधी पक्षाच्या सेनापतीनी शत्रूला जेरीस आणण्यासाठी योजलेल्या उपायांची हकीकत मोठी मनोरंजक आहे. मागे सांगितल्याप्रमाणे राजाराम हा जिंजीकडे निघून गेला होता. तो किल्ला घेण्यासाठी जुल्फिकारखान यास पाठविण्यात आले आणि त्याच्या मदतीला असदखान आणि कामवख्श यांची रवानगी करण्यात आली. अशा तऱ्हेने मोंगल मराठा संघर्षाची दोन वेगवेगळी युद्धक्षेत्रे ( Spheres of War ) निर्माण झाली.

## तामिळनाड

जिंजीचा वेढा मोंगलानी नेटाने चालविला पण त्यात म्हणण्यासारखे यश मिळेना. मराठ्यांच्या युद्धकौशल्याबद्दल लिहिताना भीमसेन सक्सेना म्हणतो, "सैतानदरीच्या (किल्ल्याच्या दुसऱ्या दरवाजाच्या म्हणजे पांडिचरी दरवाजाच्या पश्चिमेकडे) दिशेने किल्ल्याला एक लहान दरवाजा होता. किल्ल्यातील माणसे दरवाजातून ये-जा करीत. वेतावळचे जंगल किल्ल्याला लागून आहे. तिकडून किल्ल्यात रसद पोहोचत असे. . . मराठे रोज रात्री शहाजाद्याच्या छावणीत घुसून (दारूचे) बाण फेकीत. ते कमालीचे धाडस दाखवीत १६९१ आणि १६९२ साली वेढ्याचे काम रेंगाळले. इकडे स्वराज्यातही मराठ्यानी मोंगलांवर प्रतिहल्ले चढविण्यास सुरुवात केली. राजमाची किल्ल्यावर त्यांनी आपले लष्करी केन्द्र उभे केले आणि तेथून त्यांनी ठाणे आणि कुलाबा जिल्ह्यातील मोंगलांनी व्यापलेल्या किल्ल्यावर हल्ले चढविले. इ. स. १६९२ मधे त्यांनी अचानक हल्ला करून पन्हाळगड जिंकून घेतला. पन्हाळगड गेल्याचे औरंगजेबाला इतके दुःख झाले की आपला सरदार बहरामंदखान याला तो म्हणाला "पन्हाळा गेला नाही. विजापूरच जणु गेले. आता ताबडतोब ही हानी कशी दूर होईल याची तजवीज करा"

[ ह्या लेखाचा चित्तथरारक उत्तरार्ध जुलै अंकात वाचा ]

१ भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष ८, अंक ३, मोंगल व मराठे यांची खटाव प्रांतातील लढाई, ले. शं. ना. जोशी.

२, ३, ४, ५ या सर्व ग्रंथांचे मराठी अनुवाद श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी केलेले आहेत. त्यांतूनच वेळोवेळी वानगीदाखल उतारे घेतले आहेत.










भरभरून दिली प्रीत आणि भरभरून दिले रितेपण तरीही प्रीत रिती झालीच नाही !! रित्या पण रित्या न झालेल्या कहाणीचा अखेरचा हुरहूर लावून जाणारा हप्ता"…….
(वाचनीय, वेधक आणि मनाला गुंगवून टाकणारा)

# प्रीत पिउनि मीहि रीति

**मत्सरातुनी उगवे प्रीती**

**नोरा** आई झाली होती. पण पत्नी राहिली नव्हती. नवरा होता. त्याच्याकडे ती अधुनमधून पूर्वसूचनेनुसार जात येत होती. शय्यासोबतही करीत होती. आणि तरीही ती एकटी होती. पत्नी नव्हती, तिला जमाखर्च मांडणेच भाग होते. पण नवऱ्याचे प्रेम मिळविण्यासाठी त्याच्या मनात मत्सर उत्पन्न करणे भाग होते. त्याला शरीर नाकारणे हा मार्ग होता. पण ती प्रामाणिक होती. आणि "मी आहे तशी जर त्याला चालत नसेल तर मीही त्याच्याकडे जाणार नाही" अशी भूमिका तिने स्वीकारली होती.

नवऱ्याचे प्रेम मिळविण्यासाठी काही क्लृप्त्या लढविणे भाग होते. नोराने काही मित्र जमवायला सुरुवात केली. काहींच्या बरोबर ती वारंवार दिसू लागली. आणि एके ठिकाणी तर **बाब हटन**-बरोबर ती असताना तिला इरॉल दिसला. त्याच्या नव्या चित्राची नायिका **इडा लुपिनो** ही त्याच्याबरोबर होती.

नोराने टेनिस खेळायला सुरुवात केली. तिचा खेळ जसजसा सुधारू लागला तसतसे तिला वाटू लागले की त्या खेळाने तिचा प्रीतीचा खेळही सुधारेल. इरॉलचे लक्ष स्वतःकडे वेधून घेणे हे तिला महत्वाचे वाटत होते. त्यासाठी ती वारंवार निरनिराळ्या माणसात जाऊ-येऊ लागली. एक दिवस इरॉलचा तिला फोन आला. तो म्हणाला, "अलिकडे तू बरीच भटकतेस?"

"हो ना ! काय मजा असते रे ! लोक खूप खूप चांगले वागतात माझ्याशी."

"आज रात्री मला भेटशील ?"

नोराने क्षमायाचनापूर्वक नकार दिला. "खूप दमले रे" ती म्हणाली.

त्यानंतर दुसऱ्या दिवशीही ठरल्याप्रमाणे ती मुद्दामच त्याच्याकडे गेली नाही. त्यानंतर त्याचे फोन येत गेले. नोरा पोकळ आश्वासने देत गेली. फुले आणि कँडीच्या भेटी येत गेल्या. नोराचा खेळ रंगत होता. मनातल्या मनात ती सुखावत होती. तिचा वरचष्मा सिद्ध होऊ लागला होता. एके दिवशी इरॉलने तिला फोन केला. म्हणाला "तुझे माझे लग्न झाले आहे ही गोष्ट तू विसरलेली दिसतेस."

"तूच तर म्हणालास की आपण सध्या जसे राहतो आहोत त्या पद्धतीच्या आयुष्यात माणसाने कसं मोकळेपणाने वागलं पाहिजे. भटकलं पाहिजे. मजेत काळ कंठला पाहिजे. मी तरुण आहे असं तूच ना म्हणत होतास ? आणि तू तरी असंच मजेत आयुष्य काढतोस की…."

इरॉल अवाक् झाला.

पण त्यातून ओढ वाढत होती. माया दाटत होती. ॲलेक्सकडून त्याच्या मनस्थितीची माहिती तिला कळत होती. फार ताणण्यात अर्थ नाही हे नोराला कळत होते. एके दिवशी तिने इरॉलचे आमंत्रण स्वीकारले.

"सुंदर" इरॉल म्हणाला.

नोराच्या योजनेनुसार सारे काही घडत होते. दोन तास खपून नोराने रंगवेषभूषा केली. ती मुलोलँण्ड फार्मवर गेली तेव्हा **बाब फोर्ड** बाहेर पडत होता. नोराला पाहून तो म्हणाला "सुंदर."

निवेदक : प्रभाकर अत्रे

इरॉलने तिला पाहिले तेव्हा तोही म्हणाला "सुंदर."

दोन्ही अभिप्राय 'सुंदर' होते. नोराचा विश्वास वाढला. त्या रात्री इरॉल तिला म्हणाला "मुलीला घेऊन इथे रहायला ये. मुलीला घर हवं. पालक हवेत्."

आनंदाने नोराचे हृदय भरून आले. ह्या शब्दांची तर ती भुकेली होती. पण अत्यंत संयमाने तिने ती तृप्ति चेहऱ्यावर दिसू दिली नाही.

"इरॉल" तुला ठाऊकच आहे की आता आपले संबंध पूर्वीसारखे राहिलेले नाहीत. काहीसे स्वतंत्र आयुष्य आता मी जगते आहे. त्याचा आनंदही मी उपभोगते आहे. तुझ्या सहवासाला मी मुकले आहे, खरे आहे. तुझ्या सूचनेचा मला विचार करायला हवा. इथे तुझ्याकडे येऊन राहण्यापूर्वी काही गोष्टी निश्चित कराव्या लागतील."

असं म्हणून तिने त्याला काही अटी घातल्या. मुलीला व नोराला त्याच्या बाहेरच्या लफडयांचा त्रास होता कामा नये. त्या स्त्रियांना घरी आणता कामा नये. 'झाका' ह्या बोटीशी त्यांचा संबंध येता कामा नये वगैरे अटी तिने घातल्या. त्या त्याने मान्य केल्या. 'विचार करून सांगते' नोरा म्हणाली.

ती रात्र जणु मधुचंद्र घेऊनच आली होती. त्या रात्री ती पुन्हा गर्भवती झाली. 'रोरी' ह्या मुलाचा त्यातून जन्म झाला.



## कमकुवत पण दुष्ट नाही

'द ॲडव्हेंचर्स ऑफ द झाका' आणि एक प्राणिशास्त्रावरील चित्रपटाच्या निर्मितीसाठी इरॉलने झाका बोट सागरात सोडली. त्याचे वडील हे प्राणिशास्त्राचे तज्ञ प्राध्यापक होते. नोरा बरोबर होती. त्या बोटीवर असतानाच तिने ती गर्भवती झाल्याची वार्ता इरॉलला दिली. इरॉलला खूप आनंद झाला. त्यानंतर "आपण जेव्हा परत जाऊ तेव्हा तू मुलोलॅण्ड फार्मवर रहायला यायचे हं" असं वचन त्याने तिच्या जवळ मागितले. खेळ संपला होता. इष्ट व अपेक्षित निर्णय मिळालेला होता. तिने संमति दिली.

पण इरॉलच्या मद्यपानावरून व विशिष्ट प्रकारच्या अफूची, मद्यार्काची जी इंजेक्शने तो घेत होता त्यावरून प्रो. फ्लिनला व नोरालाही चिंता वाटत होती. त्यासंबंधीचा विषय निघताच इरॉल भडकला व नोराला मारायला धावला. त्याचे वडील मध्ये पडले. नोरा वांचली. गुडघ्याची लाथ पोटात बसलीच.

"इथून चालता हो! माझ्याशी एक शब्द बोलू नको." प्रो. फ्लिन मुलाला म्हणाले.

"तुमच्या मुलाला तुमची फार फार गरज आहे. तो मनाने कमकुवत आहे-- पण दुष्ट नाही" नोरा त्यांना सांगत होती.

तेवढयात दार वाजले. "मी आहे नोरा" इरॉल म्हणत होता. त्याच्याशी एक शब्दही बोलण्याची तिची तयारी नव्हती. तो आत आला. तिला मिठीत घेऊन म्हणाला "नोरा, मी काय करतो आहे ह्याची मला








शुद्ध राहिली नाही." आणि त्याच्या डोळ्यात अश्रु तरळले. नंतर तो अंथरुणात पडून खूप रडला. तो अफूच्या नशेत काही-तरी करून बसला होता. त्याला पश्चात्ताप झाला होता. तिने ओल्या टुवालाने त्याचे डोळे पुसले. तो हसला.

"मी आता घरी परतावं हे बरं असं मला वाटतं."

"नाही लाडके. पुन्हा असं घडणार नाही."

"हे कारण नाही इरॉल. मला रक्तस्राव होतो आहे. इथे डॉक्टरही नाहीत. काळजी घेतली नाही तर बाळाला इजा होण्याची भीति आहे."

खेदपूर्वक इरॉलने संमति दिली. लाथ खाऊनही नोराला त्याच्या प्रीतीची खात्री पटली. जे घडले होते ते इरॉलच्या हातून नव्हे—एका पाशवी शक्तीच्या हातून—तिचे मन ग्वाही देत होते.

विमानाने ती घरी परतली. ती परतली तेव्हाही इरॉलचे डोळे पाण्याने भरले होते.

### मज हवे ते गवसले ग

१२ मार्च १९४७ ला नोराला दुसरी मुलगी झाली. मुलाची अपेक्षा नव्हे खात्री होती. सहा आठवडे मुली राहून नोरा इरॉलकडे पुन्हा राहण्यास गेली. नर्सरी आणि सुंदर फर्निचर तिने करून घेतले. इरॉलाला तिने ते दाखवले तेव्हा तो म्हणाला, "तुझ्यात खूपच सुधारणा झाली आहे. सिगरेट काऊंटरवर पाहिलेली निरागस मुलगी लुप्त झाली आहे."

"मला फार चांगला गुरू भेटला."

"त्यामुळे आता आपण गुरूला सहज हाताळू शकू असा विश्वास तुला वाटतो?"

"शक्यता कमी."

"इतर गुरूंच्या मानाने मी फारच अपवित्र होतो, नाही ?

"आहेसच मुळी."

इरॉल म्हणत होता ते खरं होतं. नोरा वाढली होती. तिचे स्त्रीत्व व पत्नीत्व बहराला आले होते. आपल्या पुरुषाला मुठीत ठेवण्यासाठी ती धडपडत होती. इरॉल बहुस्त्रीक होता. पण त्याची लफडी कमी करीत आणली होती तिने. नोराला मर्यादा होत्या. त्यांची तिला जाणीव होती. इरॉलला वादपटु स्त्री नको होती. त्याला शय्यासोबतीण हवी होती. प्रेयसी हवी होती. आणि त्याच्यासारखे भटके आयुष्य आवडणारी, नौकानयनात रस असलेली स्त्री हवी होती. नोरा हे सारे करीत होती. आवडीने ! व्यावसायिक बाबीत ती लक्ष घालीत नसे. इरॉललाही ते मान्य नव्हते. तो तिला म्हणाला "जेवणा-साठी वेत काय करू असं फार तर विचार !" नोराबरोबर किरकोळ खरेदीसाठी सुद्धा हिंडणे त्याला आवडे. तिला काय शोभेल ते तो ठरवीत असे.

एक वर्ष फार चांगले गेले. नोराच्या स्वप्नात तिने जसा नवरा पाहिला होता तो इरॉलच्या रूपाने तिला प्रत्यक्षात लाभला होता. दोघेही तृप्त होते. निदान नोरा तरी तसे मानीत होती. इरॉलला दोन्ही मुले आवडत होती. त्यांची छायाचित्रे तो पाकिटात बाळगत होता. लिली डामिटापासून झालेल्या **"सीन"**चेही छायाचित्र त्यात होते. फ्लॉरिडामधून त्याच्या येणाऱ्या पत्रांनीही इरॉल हर्षित होत होता.

### जादा डोस

अफू, कोकेन आणि मॉर्फिन यांचे इरॉ-लला भारी वेड होते. नोराची ती चिंता होती. अमली पदार्थ जास्त घेतल्याने पौरुषहानी होते असेही तिने ऐकले होते. इरॉलचे हे वेड वाढले तेव्हा तिने तशी भीति व्यक्त केली. तेव्हा इरॉल हसून म्हणाला "डरो मत. इरॉलने कधी बाईला दंगा दिलेला नाही." आणि तिच्याकडे पहात म्हणाला "निदान एका सुंदर आईला तर नाहीच नाही."

नोराला ते आवडत नाही म्हणून मग तो बाथरूम वा एखाद्या खोलीचे दार बंद करून घेऊन ती इंजेक्शने घेऊ लागला.

एक दिवस तो शूटिंगसाठी स्टुडिओत गेला असता तिने ते सारे अमली पदार्थ एकत्र केले. शेगडीत टाकून दिले. इरॉल आला. त्याने सर्वदूर शोध केला. त्याला ते पदार्थ सापडले नाहीत. धाडधाड पायऱ्या उतरून तो खाली आला. "नोरा!" वर्षानंतर तो तिला नावाने हाक मारीत होता. 'माझ्या पाठीत खंजीर कुणी खुपसला आहे ? तू ?"

"होय ! मी ते सारे फेकून दिले आहे."

इरॉलने मुठी वळविल्या. नोरा मागे मागे सरकत गेली. पण इरॉलने मनाला आवर घातला. तो धाडधाड खाली गेला. गाडी काढली. बाहेर पडला. नोराने त्याचा माग काढला. इरॉलने ते पदार्थ विकत घेतले. तो निघून गेला. नोराने त्या माणसांना ते पदार्थ इरॉलला न विकण्याबद्दल विनवले पण काहीही उपयोग झाला नाही.

इरॉलच्या सूचनेवरून ती दोघे झाका बोट घेऊन जमेकाला गेली. तेथे नोराला पाठीवर घेऊन इरॉल पाण्यातून खूप पोहत गेला. पाण्याखालची ती दुनिया नोरा प्रथमच पहात होती. पाण्यात आणि डेकवर त्या दोघांचा प्रणय खूप रंगला. जणु ती प्रथमच मधुचंद्रासाठी बाहेर पडली होती.

एक दिवस आपण थकलो असे इरॉल म्हणाला. त्याने एका जमेकन डॉक्टरकडून कसली तरी इंजेक्शने घेतली. आणि त्याचा त्याच्यावर इतका भयानक अंमल चढला की तो एखाद्या दगडी पुतळ्यासारखा बसून राहिला. डोळे स्थिर झाले. हात पाय हलेनात. नोराने डॉक्टर शोधण्याचा यत्न केला. फसला. मग ती त्याच्या शेजारी बसून राहिली. निश्चल नजरेने इरॉल छताकडे पहात पडला होता.

तासाभराने इरॉल शुद्धीवर आला. नोराला म्हणाला "माँ, हात धर माझा"









अनुक्रमणिका

(तो तिला 'माँ' हे प्रेमाने म्हणे)

मग तो खुषीत येऊन बोलत राहिला. डोळ्यात चमक आली. आणि अचानक डोळे निस्तेज झाले. नोरा रडू लागली. "रडू नको नोरा, मी आनंदात आहे. मी झोपलो की तुला बरे वाटेल का ?"

"होय !" नोरा म्हणाली.

"मला हे मद्य तरी घेऊ देशील काय ?"

"घे."

त्याने मद्य संपविले. "तू माझ्या शेजारी झोपणार असशील आणि रडणार नसशील तर मी झोपतो" तो म्हणाला. नोरा त्याच्या शेजारी पडली. ती आतून खूप घाबरली होती. **'अपोलोनिया'**लाही तिने तिथेच बसवून घेतले. ती दोघेही रात्रभर जागी होती. इरॉल शांतपणे पडून राहिला. जागा झाला तेव्हा त्याला त्यातले काहीच स्मरत नव्हते. "स्मरत नाही तेच बरे" नोरा मनोमन म्हणाली.

"मला एक वचन देशील ?"

"काय ?"

"त्या डॉक्टरला पुन्हा बोलावू नकोस."

"कोणता डॉक्टर? काय म्हणतेस काय?"

"विसरून जा ते सारं" नोरा म्हणाली.

"तुला काही तरीच स्वप्न पडतातसं दिसतं" इरॉल तिला म्हणाला."

"असेल. तसंही असेल."

अपोलीनियोच्या मते अमली पदार्थाचा जादा डोस डॉक्टरने दिला असावा. त्यातच अतिरिक्त मद्यपान हेही एक कारण झाले असावे.

## ढळला रे दिन सखया

'एक दिवस नोरा बाथरूमकडे गेली. बाथरूमचे दार लावलेले नव्हते. ती आत गेली. इरॉल अमली पदार्थाचे इंजेक्शन घेत होता.

"दार वाजवायला काय झालं होतं?" इरॉल म्हणाला. त्याचा चेहरा लाल झाला होता. नोराचा पति इरॉल फ्लिन जणु जागेवर नव्हताच.

"दवाखान्यात जा इरॉल. तुला एक वाईट व्यसन जडलं आहे. तुला मदतीची गरज आहे."

"आणि तुला माराची गरज आहे." इरॉल म्हणाला आणि त्याने तिला एक गुद्दा हाणलाच.

सायंकाळी **फ्रेडी मॅकोव्हाय्** जेवणाला आला तेव्हा इरॉल सारे काही विसरूनही गेला होता. पण नोरा मनातून घाबरली होती. तिने फ्रेडीला जखमा दाखवल्या. "मला यातून बाहेर पडलंच पाहिजे फ्रेडी" ती म्हणाली.

"मद्याच्या धुंदीत नवऱ्याने चार दणके दिले म्हणून काय बिघडलं ?"

"मद्याच्या नव्हे" नोराने त्याला सारे पटवून दिले.

फोनवरचे बोलणे संपल्यावर इरॉल परत आला. फ्रेडीने त्याला बाहेर नेले. ते दोघे परत आले तेव्हा दोघांचेही कपडे मळले होते. फाटले होते व दोघांच्या चेहऱ्यांवर बरेच खरचटले होते.

"माझी आत्यंतिक निराशा झाली. आता तू इरॉलला सोडून निघून गेलीस तरीही मला वाईट वाटणार नाही." फ्रेडी नोराला म्हणाला.

इरॉल मात्र एक शब्दही न बोलता वरच्या मजल्यावर निघून गेला होता.

त्याच संदर्भात बोलत असताना मृत्यूचा विषय निघाला. तेव्हा इरॉल नोराला म्हणाला, "मृत्युनंतर तुला अग्निसंस्कार आवडेल की, पुरून घेणे आवडेल ?"

"मला दोन्हीही गोष्टी आवडणार नाहीत."

"मलाही !" इरॉल म्हणाला. सुंदर कॅनव्हासमध्ये माझे शरीर गुंडाळून समुद्रात फेकून दिलेले मला अधिक आवडेल. आणि पुरणारच असतील तर समुद्र-किनाऱ्यावर मला पुरलेले आवडेल."

ह्या स्मृतींनी नोरा अस्वस्थ झाली.

अमली पदार्थांच्या आत्यंतिक सेवनाने इरॉलचा तोल वारंवार जाऊ लागला. मारहाण वाढली. प्रत्येक मारहाणीनंतर नोरा त्याला सोडून जायचा विचार करी. पण तो शुद्धीवर आला व त्याने गयावया करून क्षमा मागितली की, सारे विसरून ती त्याला क्षमा करी. त्याला साथ-सोबत देई. "आपण किती मूर्ख आहोत" असे ती स्वतःला वारंवार बजावीत असे. पण इरॉलची दुर्बलता, त्याची अगतिकता व व्यसनाधीनता ती समजू शकत होती. तो वचने देत होता. पण त्याला ती पाळता मात्र येत नव्हती. 'झाका' बोटीवर एक चित्रपट घेतला जात होता. इरॉल आणि नोराच्याच जीवनावर तो आधारित होता. संघर्षातून ती प्रेमकथा रंगत होती. विचित्र योगायोग, दुसरं काय ?

इरॉलला पाण्याचे जबर आकर्षण होते. **पॉइंट फॉली**च्या जुन्या किल्ल्यांचे अवशेष बघून येऊया म्हणून एक लाँच घेऊन ती दोघे निघाली. पण परतताना प्रचंड वादळात ती सापडली. लाटांबरोबर इरॉलचा आनंदही नाचू लागला. नोरा घाबरली. "बुडलो असतो तर ?" ती म्हणाली.

"त्यात काही विशेष नव्हतं ग ! मी तुला सहज वाचवलं असतं."

"तुझं काय झालं असतं पण ?"

"कदाचित् अल्कोहल मला एक दिवस मारीलही. पण पाणी मला कधीच ठार• करू शकणार नाही."

त्याला संकटे आवडत, त्यावर स्वार होणे तर फारच आवडत असे. कुठलीही गोष्ट बाळबोध पद्धतीने केलेली त्याला चालत नसे. त्याचा तेढा मार्ग ठरलेला असे. पराक्रम हा इतका मोठा असे की किरकोळ दोष त्यात गाडले जात असत. शांततेने, थंडपणाने केलेल्या गोष्टी त्याला आवडत नसत.

नोराचा स्वभाव अगदी उलट होता.

## संध्याछाया भिववित हृदया

इरॉलचे व्यसन वाढले. नोराचा वैताग वाढला. त्याला सोडून द्यावेसे तिला तीव्रतेने वाटत होते. पण सोडताही येत नव्हते. पति म्हणून तिची निष्ठा होती. मुलांचीही त्याच्यावर माया होती. त्याचे व्यसन प्रमाणाबाहेर गेले असल्यामुळे तो एकटा पडला असता आणि त्यातून काही हानी पोहचण्याची भीति होती. हॉस्पिटलची कल्पना त्याने धुडकावून लावली. "मी काही व्यसनाचा गुलाम झालो नाही." तो तोंडाने






म्हणत होता. पण खोलीत कोंडून ठेवल्यानंतरही तो खिडकीतून चढून घराबाहेर पडत होता. 'प्रयत्न करीन' म्हणत होता. पण प्रयत्न मात्र त्याला जमत नव्हता. उलट तो म्हणत होता. "तुलाच मी एक इंजेक्शन देतो. म्हणजे मी कशा अवस्थेतून जातो ते तुला कळेल. आणि इरॉलने वळजबरीने तिला जवळ ओढले. तिच्या मनगटात तो ती सुई घुसवू लागला. तुझा बापसुद्धा तुला आता वाचवू शकणार नाही." तो म्हणाला. झटापट झाली. ती शय्यागाराकडे पळाली. इरॉलची सुई त्याच्या हातून पडली. पण त्याने नोराला तुफानी तडाखे द्यायला सुरुवात केली. तेवढ्यात हाताने तिने तोंडाचे रक्षण करण्याचा प्रयत्न केला. इरॉलने संतापाने त्या हाताचा अंगठाच मोडून टाकला होता. आणि मग तो खुर्चीत बसून ओक्साबोक्सी रडू लागला. "मी काय करीत आहे ह्याची मला शुद्ध नव्हती."

"ते मला ठाऊक आहे, इरॉल"

फॅमिली डॉक्टर आले. तिला म्हणाले. "नोरा हे तू फार काळ सहन करते आहेस. मी पाहतो आहे. एक दिवस तो तुला ठारही मारील. आणि तरीही थडग्यातून बाहेर येऊन तू इरॉलचीच बाजू घेशील."

आंगठा बसवला गेला. पण वेदना कमी झाली नाही. शरीराच्या आणि मनाच्याही! त्या भरात नोराने टेबलावरच्या झोपेच्या साऱ्या गोळ्या खाऊन टाकल्या.

आणि मग—

तिला मुलांची तीव्रतेने आठवण झाली. त्यांच्यावर आपण अन्याय करीत आहोत अशी जाणीव झाली. तिने **फ्रॅंक नोलन** (फॅ. डॉक्टर) ला फोन केला. त्याने इरॉलला सूचना दिल्या. इरॉल आणि बड अर्स्टने तिची काळजी घेतली. इरॉलने तिच्या घशात बोटे घालून त्या गोळ्या पाडल्या. म्हणाला "काय तुझी दशा केली ग मी !"

डॉक्टर नोलन आला. त्याने तिला ट्रीटमेंट दिली. ती बरी झाली.

तिने घर सोडायचा निर्णय घेतला. ती निघाली तेव्हा इरॉलने पुष्कळ समजुत काढण्याचा यत्न केला. "मी तुझ्यावर प्रेमच करीत आलो नोरा, घटस्फोटाचा विचार सुद्धा मनात आणू नकोस."

गाडी हलली. डेर्ड्री म्हणत होती "अच्छा बॅरन, गुड बाय"— नोराचे डोळे आसू गाळू लागले.

नंतरच्या काळात इरॉलने तिला परत घरी बोलावले. तू परत येणार, राहणार असशील तर मी हॉस्पिटलमध्ये राहीन." तो म्हणाला.

"हा वचन पाळील ?" नोरा विचारात पडली.

एक संधि देणे कर्तव्य होते. स्वत:साठी

नाही तरी मुलांसाठी तरी ! कारण मुलांचे इरॉलवर भारी प्रेम होते.

"तीन दिवसात घरी येते" तिने इरॉलला वचन दिले.

पण तिला ते वचन पाळता आले नाही.

तसा योग नव्हता असेच म्हटले पाहिजे.

## अता मधूचे नाव कासया ?

नोराला एक वेगळाच माणूस भेटला होता. समदुःखी होता तो. 'जोन इव्ह' पासून तोही घटस्फोट घेण्याच्या विचारात होता. तिची व त्याची टेनिसकोर्टवर भेट झाली. स्नेह जडला. त्याचे वागणे–बोलणे–चालणे सारे मोहक प्रेमळपणाचे होते. 'विचार करायला मुदत घे' इरॉल तिला म्हणाला होता. त्या काळातच तिला रिचर्ड हेम्स् भेटला होता. तिचे त्याचे सख्य जेव्हा इरॉलच्या कानी गेले तेव्हा तो अस्वस्थ झाला. 'युरोपच्या सहलीला जातो तू पण चल' तो म्हणाला. नोराने नकार दिला. रिचर्डचे, तिचे संबंध जेव्हा प्रकटपणे चर्चिले जाऊ लागले तेव्हा इरॉल जमेकाला होता. त्याने तार करून नोराला विमान-तळावर बोलावले. ती एकटी गेली. तमाशा होणार असे तिला मनोमन वाटत होते. विमानातून उतरताच इरॉलने तिची उलट-तपासणी सुरू केली.

"तुझ्यात आणि त्या गायकात कसले संबंध आहेत ?"

"तुला कसे असावेसे वाटतात ?"

"त्याने जोनला सोडले आहे हे खरे आहे काय ?"

"खरे आहे."

"तुला त्याचे आकर्षण वाटते काय ?"

"खूपच !"

"त्याला तुझ्याबद्दल तसेच वाटते काय?"

"वाटते."

"त्याचे तुझ्यावर प्रेम आहे काय ?"

"असं तो म्हणाला."

"तुझे त्याच्यावर प्रेम बसले आहे ?"

"मला — ते नीटसे सांगता येत नाही. खात्री नाही."

दररोज नवे प्रश्न–नवी टोचणी. आणि त्याचे तुफान मद्यपान ! इरॉलचा अहंकार आणि अभिमान दुखावला गेला होता.

मार्ज एडिंगटन इरॉलची सेक्रेटरी म्हणून काम करू लागली. एक मुलगी नोराजवळ होती. दुसरी नोराने इरॉल-जवळ राहू दिली– त्याच्या विनंतीवरून !

नोराच्या मागावर इरॉलने हेर ठेवले. तिचे सारे बोलणे ऐकण्याची व्यवस्था केली. नोराला हे सारे कळले तेव्हा नोराने निश्चय केला.

"मला घटस्फोट हवा आहे" तिने इरॉलला फोन केला.

"माझ्या अटींवर" तो म्हणाला.

"अटी कोणत्या ?"

"एक मूल मजजवळ राहील."

तसे होणे नाही. कोर्टात गेलास तरी निर्णय तुझ्या विरुद्ध जाईल. मला पैसे नको. मला मुली हव्यात."

त्यानंतर बरीच दमबाजी झाली आणि त्यात 'तुला मी बघून घेईन. तुलाच नव्हे तर डिक हेम्स्लाही बघून घेईन." असे तो नोराला म्हणाला.

नोराचे वडील मार्जला आणायला त्याच्या घरी गेले. तेथून जाऊन आल्यानंतर ते म्हणाले, "भयानक अनुभव मी घेतला. हातात सतत बंदूक घेऊन इरॉल वावरत होता. म्हणाला, "नोरा डिक हेम्स्च्या प्रेमात पडली आहे हे मला ठाऊक आहे. मी तिला मुकलो कसा हेच मला समजेनासे झाले आहे. पण मी विचारपूर्वक ह्या घटनाबाबत आत्मपरीक्षण केले, तर मीच चुकलो आहे असं मला वाटते." बोलता बोलता त्याचा हात 'ट्रिगर' वर जात होता. नोराच्या वडिलांच्या मनाचा थरकाप होत होता.

"ज्या एका स्त्रीवर मी नेहमी फक्त प्रेमच करीन अशा एका स्त्रीला मी गमावून बसलो आहे. माझ्यामुळेच" बोलता बोलता सिगरेट पेटविण्यासाठी तो थांबला. बंदूक बाजूला ठेवली. तिच्या वडिलांनी ती झटकन् उचलली. इरॉलने ती ओढून घेण्याचा प्रयत्न केला. पण मग बाजूला होत तो म्हणाला "माझ्याजवळ पुष्कळ बंदुका अन् काडतुसे आहेत म्हटलं."

हे सारे नोराला सांगून तिचे वडील तिला म्हणाले "खरं सांगू नोरा, माझ्या मते तुझ्यावर त्याचं मनापासून प्रेम आहे. तू त्याला परत यायला हवी आहेस आणि तुला परत नेण्यासाठी तो वाट्टेल ते करील. तुझी प्रीति त्याला परत हवी आहे."

"ती प्रीति संपली पण, एक माणूस, माझ्या मुलींचा बाप, कलाकार, नट म्हणून मी अजूनही त्याच्यावर प्रेम करते, पण मी यापुढे त्याच्या बरोबर कधीही राहू शकणार नाही."

इरॉलने घटस्फोट टाळण्याचा खूप प्रयत्न केला. वारंवार फोन केले. पण जे घडणार होते ते घडले.

मे १९४९ मध्ये नोराचा घटस्फोट मान्य झाला. एक महिन्यानंतर तिने रिचर्ड हेम्स्शी लग्न केले. तिच्या दोन्ही मुली तिच्याजवळ होत्या. इरॉलने अभिनंदनाची तार पाठविली. तो युरोपला निघून गेला. परत आला तेव्हा मुलींना भेटायला गेला. इरॉल खूप बदलला होता. मद्यपान वाढले होते. 'अमली' सेवन वाढले होते. "दुनिया गयी जहन्नममें" ह्या भावनेने तो वागू लागला होता. "तू सुखी हो नोरा. माझे तुझ्यावर व मुलींवर पूर्वीइतकेच प्रेम आहे." असे तो जाताना म्हणाला.

नंतर तो 'रॉकी माऊंटन' चित्रासाठी न्यू मेक्सिकोला गेला. नायिका "पॅट्रिस वेमोर" ही होती. पेट्रिस आणि नोरामध्ये विलक्षण साम्य होते.

इरॉलचे व पेट्रिसचे लग्न झाले. ती दोघे परत आली. लग्नाचे छायाचित्र पाहून नोरा म्हणाली, "आम्ही दोघे लग्न करून परतलो त्या फोटोचीच ही प्रतिकृति वाटते.

ती दोघे हंसली. दोघांचे एकमत झाले होते.

पॅट्रिसशी लग्न झाल्यावरही त्याचे मन नोराभोवतीच घोटाळत राहिले होते. ती दोघे बोलत असता पेट्रिस आली तर तो तिलाही परत पाठवित असे.

नोरा पेचात पडत असे.

"ही प्रतारणा तर नाही ना?" ती मनात विचार करीत राही.

## लागले नेत्र रे पैलतिरी

१९५३ मध्ये नोराने रिचर्डशी घटस्फोट घेतला. भांडण तंटे म्हणून नव्हे. फार 'बाळबोध' आयुष्य जात होते म्हणून. इरॉलच्या सहवासात एक प्रकारची गति होती. धुंदी होती. बेहोषी होती. वीजेचे चापल्य होते. रिचर्ड 'नॉर्मल' होता.

'पुन्हा एकत्र यायला काय हरकत आहे' इरॉल म्हणाला.






"नाही ! कां ते तुला ठाऊक आहे ?" नोरा म्हणाली.

उत्कट प्रीति अनुभवूनही, त्याच्या रम्य आठवणी वर्षानुवर्षे उराशी बाळगूनही नोराने हे उत्तर दिले होते.

१९५८ साली नोरा न्यूयॉर्कला गेली. इरॉल भेटला. दुःखी होता. "लग्न होऊनही मी एकटा आहे नोरा." तो म्हणाला.

"इरॉल अतिशय वेगाने मृत्यूच्या दिशेने पळत जातो आहे असे नोराला त्या सफरीत ध्यानी आले. मृत्यूचे उल्लेख कळत नकळत त्याच्या मुखातून येऊ लागले.

लॉस एंजेलिसला नोरा त्याला भेटली तेव्हा त्याच्याकडे पाहून तिचे मन आक्रंदून उठले. त्याला मिठी मारावी. एखाद्या लहान मुलासारखे त्याला सांभाळावे. त्याची खूप काळजी घ्यावी."

बाहेर येत तो म्हणाला "मॉं, डॉक्टर म्हणतात दोन तीन वर्षे जरी मी जगलो तरी फार झालं. यकृत पार खलास झालं आहे. मी एक नवीन मृत्युपत्र तयार केलं आहे."

"त्याची चर्चा आता नको इरॉल. खरंच नको."

तो म्हणाला, "हीच वेळ आहे" तो तपशील सांगू लागला. रोरी आणि डेर्ड्रीला जमेकन इस्टेट मिळेल. पॅटला काही नाही. एक पैही नाही. तुम्हा तिघांची मला फार चिंता वाटते नोरा."

तपशील सांगून झाल्यावर तो म्हणाला "मी आत्मचरित्र लिहितो आहे नोरा. पण त्यात आपल्या वैवाहिक जीवनातल्या रमणीय स्मृतींबद्दल लिहिणार नाही. त्या चिरंतन आहेत. पवित्र आहेत."

"खरोखरच चिरंतन" नोरा म्हणाली.

१४ ऑक्टोबर १९५९ ला इरॉल फ्लिनची जीवनयात्रा संपली.

फार गतिमान आयुष्य तो जगला. अनेक जखमा त्याने नोराला केल्या. त्या भरून आल्या. त्याची प्रीति हा तिच्या श्रद्धेचा, जाणीवेचा, अनुभवाचा विषय होता. चर्चेचा नव्हता. कायद्याचा नव्हता. कधी-तरी तिला वाटून जात होते....

"मी त्याला आणखी एखादी संधी दिली असती तर—" प्रश्नाचे उत्तर तिला गवसले नाही.....

"इरॉलसारखा इरॉलच ! दुसरा होणे नाही" असं नोरा स्वतःच्या मनाला बजावीत होती.

[संपूर्ण]



# ऐलतीरी ...... पैलतीरी

कधी वाळवंट तर
कधी ओयासिस्....कधी घोडे तर
कधी खेचरे....कधी डांस तर
कधी बुलेट्स....एकूण काय
लढाई म्हणजे एक बाजी....
लगा दो अपने पे भरौसा
है, तो एक दाव....



कॅ. जी. एन. नामजोशी

**दुसरे** महायुद्ध सुरू होऊन दोन वर्षे झाली होती. नागपूरच्या मेडिकल कॉलेजचा अभ्यासक्रम संपवून मी त्या सुमारासच मेयो हॉस्पिटलमध्ये नोकरीस लागलो होतो. तेथील नोकरीही तशी फारशी झाली नव्हती. कॉलेजातील वैद्यकीय ज्ञान हळूहळू बोटातून सराईत-पणे रोग्यांचे निदान करण्यात पारंगत होत होते. १९४१ साल उजाडले नि एक दिवस इंडियन आर्मी मेडिकल कोअरचे (आताचे आर्मी मेडिकल कोअर) शिक्षण घेण्यासाठी तातडीने पुण्याला रुजू होण्याचा हुकूम हाती पडला. मारे थाटामाटाने सहकाऱ्यांनी निरोप दिला. सौ. वसुंधरा मात्र नाही म्हटले तरी बावरली होती. नुकताच कोठे संसार थाटला होता. नवी नव्हाळी कायमच होती... खरे म्हणजे ती अजूनही उमलावयाची फुलावयाचीच होती. परंतु 'अपील' नव्हते. नि मलाही नाही म्हटले तरी त्या नवीन जीवनाची उत्सुकता होतीच.

पुण्याचे ते ट्रेनिंग म्हणजे झटपट रंगारी शाळाच. माझ्या-सारखे इतरही सिव्हिलियन्स तेथे आलेले होते. रोज सकाळी आरा-मात साडेसातला उठणे. मग गरम चहा. . .त्या आधी. . .पण जाऊदे . . . .सगळेच काय सांगायचे असते होय? नंतर दाढी... मग पेपर चाळणे, आंघोळ, नाश्टा (Breakfast) नि साव-काश साडेआठ नऊपर्यंत दवाखान्यात पोहोचणे... पण पुण्याला उठावेच लागे ५-४५ ला. आणि एकदा अंथरुण नीटपणे गुंडाळून, सर्व काही ठाकठीक ठेवून, प्रात:विधी उरकला की राहीले उभे परेड पी. टी. चे कपडे घालून. दोन तीन तास घाम गाळल्यावर कपडे बदलून लेक्चर्समध्ये सवड व व्यवस्था असेल त्याप्रमाणे न्याहरी...दुपारी एकपर्यंत लेक्चर्स ....तीन वाजता पुन्हा क्लासेस... संध्याकाळी सक्तीने खेळणे. तीन महिन्यात आमच्या उस्तादानी

(Instructors) आमचे पक्के शिपाई गडी बनवून टाकले. त्यानंतर पंधरा दिवस सुट्टी मिळाली. नागपूरला परतल्यानंतर त्या पंधरा दिवसातील ३६० तास कोठे कसे संपले याचा हिशोब करता करताच परत पुणे गाठावे लागले.

त्यावेळी आफ्रिकेतील रणधुमाळीचा डंका जोरजोराने वाजत होता. दोस्तांचे सारे लक्ष रोमेलचा सत्यानाश करण्यात गुंतले होते. एखादे गाव सकाळी दोस्तांकडे, तर संध्याकाळी दुष्मनांकडे व पहाटे परत दोस्तांचे हाती, असे सत्र सुरू होते. त्यामुळे त्या भागात डॉक्टर्स व परिचारिकांची (मेल नर्सेस) तातडीची गरज होती. म्हणून एका मोठ्या रुग्णालयाचा संपूर्ण स्टाफ व आवश्यक ती साधनसामुग्री घेऊन आमची स्पेशल ट्रेन एका रात्री पुण्याहून सुटली. आणि मध्ये फक्त घाटातील एकदोन ठिकाणी थांबून तिने तीन तासात मुंबई गाठली. ऑफिसर्स व इतर नोकर मिळून पाचशे लोक असलेले सात व सामानाचे तीन असे दहा डबे होते ते.

ऐन मध्यरात्री मुंबईच्या गोदीतील एका धक्क्याला उभ्या असलेल्या आगबोटीनजिकच आमची स्पेशल उभी राहिली. जेमतेम पंधरा वीस यार्ड दिसू शकेल एवढ्याच उजेडात गोदी कामगारांनी आमच्या गाडीतील सामान भराभर बोटीत नेऊन व्यवस्थितपणे रचले. पाठोपाठ स्वाऱ्याही दाखल झाल्या. समुद्र शांत होता. त्याच्या लाटा बोटीशी लाडे लाडे चाळे करीत होत्या. त्यामुळे 'चुबुक' असा आवाज मधूनच येत होता. इतर आवाज ऐकू येई तो गोदीतील गोंगाटाचा. पुढे, मागे, उजवीकडे, डावीकडे, नजरेच्या टापूत सगळीकडे तऱ्हेतऱ्हेच्या बोटीच बोटी होत्या. माझ्या वाट्याला दोन बर्थची एक केबिन आली होती. परंतु बोट सुटली तरीही मी एकटाच त्या केबिनमध्ये होतो.

सामानसुमान झपपट आवरून मी होल्डॉल पसरून आडवा झालो. दिवस उजाडता उजाडता बोट हलली. आणि नंतर जो त्रास झाला तो सांगता सोय नाही. त्यामुळे अक्षरशः इराणचे आखात गाठीपर्यंत माझ्या तब्येतीचे तीन तेरा झाले. कारण उलट्या, भोवळ व हंगवण.....अर्थात दुःखात सुख एवढेच की बोटीवर पहिल्या प्रथमच पाऊल ठेवणाऱ्या सगळ्याच लोकांची तशीच गत झाली असल्याने, कोणी कोणाला त्याबाबत हिणवू शकत नव्हते. जेवणखाण तर सुटलेच. झोपही येईना, श्रमही करवेनात अशी अवस्था झाली. परंतु इराणचा किनारा जवळ येऊ लागला तसा दर्या शांत शांत होऊ लागला. नि मग जरा निवांतपणे बघता येईल तेवढी सृष्टी बघून घेतली. हो घ्या काय? तिकडेच आटोपलो तर....

इराणच्या एका बंदरात आम्ही सारे उतरलो. तेथे लष्करी ट्रक्सचा तांडा उभाच होता. त्यात सामानसुमान लावून आम्ही निघालो. त्यावेळी कशी कोण जाणे लैलामजनूची आठवण झाली... हाय रे मेरी लैला... ती राहिली हिंदुस्थानात–नागपूरला आणि तिचा मजनू मात्र खरोखरीच्या मजनूच्या प्रांतात भटकत होता. फरक इतकाच की खऱ्या मजनूच्या काळी ट्रक्स नव्हत्या...तसेच लैलासारख्या लैलाही विरळाच आढळत (त्या काळी....) वैराण वाळवंटाची प्रचिती आम्हाला इराकमध्ये आली. पहाटे किंचित् गारवा, सूर्य उजाडावयाचा तोच मुळी तापत. दुपारी चार वाजेपर्यंत वरून सूर्यकिरण भाजून काढीत. तर सायंकाळी चार ते रात्री आठपर्यंतचा वेळ खालची धरती थंड होण्यात जाई. रात्री दहा ते पहाटे तीनपर्यंत हाडे फोडणारी थंडी. आणि त्या तसल्या थंडीतही भुरटे चोर आमच्या तंबूतील सामान पळवून नेत असत. कोणाची दर्री, तर कोणाची जर्सी, आणखी एकाचे लाँग–बूट, तर चौथ्याचा कॅन–टीन .....आणि त्या साऱ्या वस्तू दुसरे दिवशी, गावातील बाजारात उघडपणे विक्रीस ठेवलेल्या आढळत. आणि त्या वस्तूंचा खुला काळाबाजार सुरू असे. त्यामुळे भुरट्यांना प्रतिकार करताना कित्येक जवानांना प्राणासही मुकावे लागले...

परंतु हळूहळू आम्ही तेथे रुळलो....थोडेफार अरबी शब्द तोंडात बसले. अरबांच्या चालीरिती कळल्या. त्यांचे शौक, त्यांच्या व्यथा समजल्या. नि त्यांचे अज्ञान व दारिद्र्य पाहून अंतःकरण पिळवटत असे. आम्हीही त्यांचेपासून वाळवंटी जीवनाचे पुष्कळसे धडे गिरविले. आमचे हॉस्पिटल युनिट असल्याने काही प्रमाणात व पद्धतीने धर्मार्थ औषधोपचार सुरू केल्याबरोबर आमचेकडील चोऱ्या पार थांबल्या व ते अरब आमचे मित्र झाले. खजुरापासून केलेली अनेक पक्वान्ने, उंटिणीचे दूध, त्या दुधापासून तयार केलेले पदार्थ, खास अरबी कबाब, अरबी हेडड्रेस एक ना दोन कितीतरी तऱ्हेच्या वस्तु आम्हाला भेट म्हणून मिळू लागल्या. आम्हीही प्रतिभेट म्हणून आरसे, कंगवे, दाढीचे सेटस्; उत्तम कपबशा वगैरे वस्तु त्यांना दिल्या.......आणि एकंदरीत परस्परांना सांभाळून घेऊन राहण्यास दोघेही शिकलो.

सुमारे दीड वर्ष तेथे काढल्यानंतर आफ्रिकेच्या वाळवंटात जाण्यासाठी आम्ही प्रथम बगदाद गाठले. बगदाद शहर टिग्रिस नदीच्या काठावर वसलेले आहे. बगदादविषयी इतके काही लिहिले गेले आहे की ते वर्णन विघडविणे माझ्यासारख्या 'डॉक्टरी' वृत्तीला मानविणारे नाही. बगदादला जेमतेम पंधरा दिवस काढतो न काढतो तोच आम्हा सगळ्यांना अनेक ठिकाणी पाठविण्यात आले. माझे युनिट एका फील्ड अँब्युलन्सला जोडण्यात येऊन त्याची रवानगी अॅबिसिनियाच्या रणांगणावर झाली. आघाडीवरील जखमी जवान प्रथम तंबूत उभारलेल्या वैद्यकीय केंद्रात आणले जातात. तेथून त्यांच्या जखमांनुसार त्यांची विभागणी होऊन अत्यवस्थ लोकांना थेट बेस हॉस्पिटल किंवा फील्ड हॉस्पिटलकडे पाठविण्यात येते. अर्थात त्यापूर्वी त्यांना पार गुंगवून टाकावे लागते. कारण अति रक्तस्त्राव आणि शक्तीचा ऱ्हास झालेला असतो.

जखमांना बँडेज करून झाल्यावर जे मोटारीने पण स्वतःच्या हिंमतीवर वा ताकदीवर प्रवास करण्याच्या अवस्थेत असतात त्यांचेवरील उपचार फील्ड अँब्युलन्स युनिटमध्ये होतात. छोटी मोठी ऑपरेशन्स, सांधे बसविणे, प्लॅस्टर मारणे, खूपच जायबंदी झाले-





अनुक्रमणिका

त्यांच्या जखमांची मलमपट्टी अशा तऱ्हेने करणे की बेस वा फील्ड हॉस्पिटलपर्यंत तरी ते जिवंत जाऊन पोहोचावेत. आणि ते सगळे करीत असताना शत्रूची बाँबफेक सुरू असते. तोफखाना आग ओकीत असतो. मशीनगनने अंगाची चाळण केव्हा होईल याचाही नेम नसतो. सारांश युद्धाची भीषणता, क्रौर्य, पंगुत्व व माणसाने माणसाच केलेले हालाहाल तेथे पहावयास मिळतात. वेदनेविषयीची कणव पार मरून जाते उरते फक्त व्यावसायिक शुद्ध व तेथून परत जाण्याची ओढ.......

अबिसिनियात सुमारे चार महिने कामगिरी बजावल्यावर आमचे युनिट परत माघारी आणण्यात आले. कारण आम्हाला पूर्वेकडे पाठविण्यात येणार होते. पूर्वेतील लढाई जंगल, दरीखोरी, नद्या नाले, डास, चिलटे, वन्य श्वापदे व गनिमी हल्ले असल्या स्वरूपाची होती. त्यामुळ तसे नवे शिक्षणही घेणे आवश्यक होते.

गनिमी काव्याचे शिक्षण देणारा अधिकारी निघाला मोठा कडक. पहाटे उठून प्रातःविधी उरकून परेडचे ठिकाणी सारेजण एकत्र झाले की पहिला कार्यक्रम जर कोणता असावयाचा, तर तो, तीन मैल धावत पळत जाऊन येणे हा होय. त्यापाठोपाठ व्यायाम व इतर शारीरिक शिक्षण. दहा ते एकपर्यंत ड्रिल आणि तांत्रिक शिक्षण. परंतु या अधिकाऱ्याचे एक वैशिष्टय असे की तो स्वतः त्या सर्व कवायतीमध्ये आमच्या पुढे असावयाचा. आणि दुसरे, पळण्यानंतरचे सर्व कार्यक्रमांसाठी त्याने हब्बानिया नावाचे जे ठिकाण निवडले होते, तेथील भल्यामोठ्या तळ्यामुळे उष्मा फार कमी जाणवावयाचा. यत्‌किंचित तळे ते काय व त्याचे कौतुक ते किती? परंतु शेकडो चौरस मैल वाळूच वाळू, कोठेही करंगळीएवढासुद्धा नाला नाही, मग ओढ्याची बात दूरच. पन्नास ते पाऊणशे मैल तुडविल्यानंतर दोन चार खजुरीची झाडे व पाणवठा– पाणवठा कसला, उथळ दलदलच ती. असल्या त्या वातावरणात वावरल्यानंतरच त्या तलावाचे कौतुक कळावयाचे. तेथे साक्षात्कारच घडावा लागतो महाराज....आणि त्या साहेबाच्या शिस्तीबद्दल तापाबद्दल त्याला शिव्या देत, परंतु त्याच वेळी त्याने निवडलेल्या त्या थंडगार जागेबद्दल त्याचे कौतुक करीत आम्ही शिकत होतो. शिकवतही होतो. असे पंधराएक दिवस गेले नि एकाएकी भारताला परत येण्याचा हुकूम– सर्वांना वाचावयास मिळाला नि आम्ही सर्वचजण त्या तापत्या वाळवंटात नाचलो, बागडलो, अगदी पोराहून पोर होत एकमेकांना आनंदाने बडवून काढले.

तीन एक आठवड्याने बोट मुंबई बंदराला लागली. सुमारे दोन अडीच वर्षांनंतर या मायभूमीचे दर्शन घडले. आणखी काही घटकातच माझे पाय भारताच्या भूमीवर लागले. आईच्या मांडीवर नाचणाऱ्या 'एक पाय नाचीव रे गोविंदाची–' आठवण आली. अनेक सोबती सदाचेच रणांगणी राहिले होते. तर काही जणांना पंगुत्व आले होते. सुखदुःखाने भारावलेल्या मनःस्थितीत मी सी. ओ. कडून दादरला जाण्याची परवानगी मिळविली. आणि रात्रभर बाहेर राहण्याचीसुद्धा....कारण दुसऱ्याच रात्री आम्ही पूर्वेकडे रवाना होणार होतो. ....

रुईया कॉलेजजवळील आमच्या नातेवाईकांचे घरी पोहोचेपर्यंत अंधार पडला. प्रकाशबंदीमुळे त्या अंधाराची भीषणता अधिकच वाढली होती. तरीही माया, वात्सल्य वाट दाखवीत होते. एकेका वेळी दोन दोन पायऱ्या ओलांडून आमच्या फ्लॅटसमोर पोहोचून दार उघडले. मला पहाताच सर्वांना विस्मयाचा धक्का बसला. कारण माझे आगमन अनपेक्षित होते. पत्नीला एकादा कधीतरी लिहिले होते तेही दुरान्वयाने........कदाचित आपली भेट होण्याची शक्यता आहे... पण अर्थातच ती नित्यनेमाने माझे कल्याण चिंतीत होती व आजही चिंतिते..... पण या चतुर सखीने ती सूचना अचूक टिपली होती. आणि आपल्या सासऱ्यांना घेऊन, मुलीसह निव्वळ 'हवापालटाचे' निमित्त करून ती तेथे हजर होती. आशा खरी ठरली.......चांगले झाले.... पण ती कदाचित खोटीही ठरली असती....

उणेपुरे चोवीस तास घरी काढून परत बंदरात हजर झालो. आणि अवघ्या अठेचाळीस तासानी परत निघालो. आम्ही सारे बलिवेदीवरील समर्पणासाठी. आणि त्यावेळी दुष्मन होता जपान ...परंतु प्रत्यक्ष आघाडीवर जाण्यापूर्वी आमची एक जंगी सर्कस तयार व्हावी म्हणून आमच्या युनिटला बिहारच्या एका कोपऱ्यातील घनदाट अरण्याने वेढलेल्या ठिकाणी नेऊन टाकण्यात आले. तेथेच आमचे रेजिमेंटल सेंटरही (आमच्या रेजिमेंटची मुख्य कचेरी) स्थापन करण्यात आले.

आणि येथेच सुरू झाली आमची कसोटी. लुटुपुटूची लढाई सुरू असताच जखमींना स्ट्रेचरवरून हलविणे, तंबूत प्राथमिक औषधोपचार करताना तोफखाना वा बाँबवर्षावाचे आवाजाकडे लक्ष देऊन वागणे, गरज पडल्यास चटकन् दुसऱ्या अधिक सुरक्षित ठिकाणी निवारा शोधून मदत केंद्रे उभारणे हे काम लवकर अंगवळणी पडले. पण येथेच घोडेस्वारीचे शिक्षण घ्यावे लागले. ते मात्र कित्येकांना महाग पडले, आणि कितीतरी तऱ्हांनी.

कधी जीन नीट न आवळल्याबद्दल शिव्या, तर कधी आरूढ होतानाचा पवित्रा चुकल्याबद्दल Bloody fools चा आहेर.... तर कधी घोड्यावरून घसरताना त्याची आयाळच घट्ट धरून जेमतेम त्याला आटोक्यात आणल्यानंतर उस्तादने (इन्स्ट्रक्टर) केलेला बेचाळीस कुळींचा उद्धार... आणि खरोखरच एकादा स्वार असा सणसणीत आपटावयाचा की एकीकडे त्याची पाठ रगडताना दुसरीकडे त्याची वाटेल ती टिंगल उडवून हंशाचे कल्लोळ उठत असत. थोडक्यात अश्वारोहण हा विनोदाचाही खुराक ठरल्यानेच आम्ही त्या विकट ट्रेनिंगमधून तरलो. कारण दुपारपर्यंतचे ते फील्ड ट्रेनिंग हा एकच ताप नव्हता. तर दिवस मावळला रे मावळला की डासांच्या झुंडी नाझी विमानदलाच्या ब्लिट्‌ज क्रीगप्रमाणे आमचेवर तुटून पडत असत. आणि मलेरियावर त्यावेळचे रामबाण औषध म्हणजे फक्त कोयनेल आणि डास प्रतिबंधक सुगंध (?) असलेले मलम!

मच्छरदाणी नीट लावली की नाही ? मलम चोपडले का ? कोयनेल घेतले का, एक ना दोन हजारो प्रकारचे उच्चार आणणारे प्रश्न रात्री झोपेपर्यंत केव्हाही कोणीही येऊन विचारत असे. आणि नीट उत्तर न देण्याची आमची काय टाप होती ? भलेही आम्ही लेफ्टनंट वा कॅप्टन असलो, तरी अखेर 'कोर्स'साठी आलेलो होतो. त्यामुळे लान्स नाईक किंवा नाईक असलेल्या आमच्या 'लाईन ऑफिसर'चा अपमान म्हणजे शिस्तभंग व परिणामी दुसऱ्या दिवशी डबल परेड– त्यातही हजार तऱ्हा... मोठी मजाच होती खरी. परंतु एक मात्र खरे. त्या साध्या एन. सी. ओ.जमुळेच आम्ही जपान्यांच्या घातकी हल्ल्याला शेवटपर्यंत तोंड देऊ शकलो व ज्यांचे जीवन शिल्लक होते ते सर्व युद्ध आटोपून सुखरूप परतलो. "गुरुबीन ग्यान नहीं आवत" हेच खरे......

एकदा आमच्या सी. ओ. च्या (कमांडिंग ऑफिसर) डोक्यात काय आले, कोणास ठाऊक ! त्याने तीन आठवड्यांचा 'खेचर-कोर्स' हाती घेतला. तोपर्यंत आम्ही पटाईत घोडेस्वार बनलो होतो. त्यामुळे खेचरांची फारशी तमा आम्हाला वाटत नव्हती. आणि कोर्सचा शेवटचा दिवस उजाडला.......आम्हाला वाटले......चलो, अब खेचरोंसे छुट्टी........पण कसचे काय.. आमचा सी. सी. सुद्धा आमच्या दृष्टीने 'साला खच्चरच !' त्याने रात्री अंधारात खेचरासहित फील्ड ड्रिल घेतली.....

खेचरावर मांड ठोकून सात पद्मासनासारखे जोडून खेचराना तीन मैल पळविणे हा पहिला प्रोग्रॅम......त्यात कित्येकजण आपटले....फरफटले गेले..... पुढे अडथळ्यांची शर्यत....एकेका वेळी आठ आठ फूट लांबीच्या खड्डयांवरून खेचर उडविणे, ते उडविताना स्वतःचे आसन, पाठीवरील पॅक व उजव्या हातात लगाम, डाव्या खांद्याला बागनेटासहित रायफल हे सगळे संभाळणे. याही दिव्यातून सुटलो आणि शेवटच्या टप्यात खेचराचा लगाम हाती धरून एक मैल खाच–खळगे तुडवित दोघेही सुरक्षित जाणे हा कार्यक्रम......डोळ्यात बोट खुपसले की मगच कळावे, अरे कोणीतरी जवळ आले, असला काळाकुट्ट अंधार. त्यामुळे कित्येकांचे हातून लगाम निसटले नि खेचरे उधळली. झाले त्यांना शोधण्यासाठी नाईलाजाने टॉर्चचा वापर.......उस्तादांच्या शिव्या... कमांडिग ऑफिसरचे काळ्या आदमींना टोमणे...सुमारे चार तासांच्या त्या फील्ड ड्रीलमध्ये आम्ही क्षणात चिडत होतो, तर क्षणात स्वतःची किंवा दुसऱ्याची फजिती पाहून हसता हसता आमची मुरकुंडी वळत होती. अखेर आटोपले एकदाचे ते दिव्य. त्या मध्यरात्री लंगरमधून चहा आणविला गेला... सी. ओ. ने सर्वांना अर्धवर्तुळात बसविले. आमचे मागे खेचरानाही त्याच पद्धतीने उभे करण्यात येऊन मोतदारांनी त्यांना वैरण दिली.

चहाचा मग तोंडाला लावला न लावला तोच "अॅटेन्शन प्लीज" सी. ओ. गरजला.....आयला ! ! असली इरसाल शिवी सर्व भारतीय भाषांतून उमटली. आम्ही मग तसेच हाती घेऊन उभे राहिलो.

सी. ओ. म्हणाला चहा तोंडाने पिणे पण कान व डोळे मात्र माझ्याकडे ठेवणे... त्यामुळे वातावरण जरा हलके फुलके झाले "इजी" दुसरी आज्ञा सुटली. आम्ही जरासे सैलसर झालो.

"पोरांनो, तुम्ही मला सैतान म्हणालात. त्याचा मला अभिमान वाटतो. कारण सैतानाची सारी शिकवणूक आत्मसात केल्याशिवाय तुम्ही जपानी हैवानांच्या तडाख्यातून सुटणे अशक्य होते... म्हणूनच तुम्हाला भरपूर ताप दिला... आणि तुम्ही सगळे जण माझ्या कसोटीला उतरलात याबद्दल खरोखर अभिमानाने ऊर दाटला... येत्या अठ्ठेचाळीस तासात तुम्ही आराकानला जात आहात. बेस्ट लक अॅन्ड गॉड ब्लेस यू"......आणि काहीशा भारावलेल्या मन:स्थितीत आमचा तांडा अड्डयावर परतला.

खरोखरच पुढचे दोन दिवस आम्हाला पूर्ण सुट्टी मिळाली. तिसऱ्या दिवशी आराकानला जायचे होते ना ? त्या दोन दिवसात प्रत्येकाने आपापल्या परीने व आवडीप्रमाणे तेथे 'जिवाचा बिहार' करून घेतला. कारण परत येऊच असा आत्मविश्वास खरे तर कोणालाही वाटत नव्हता. याचे असे मात्र सर्वांनाच न वाटल्यास नवल काय ?

आराकानची वाट कलकत्ता बंदरामार्गेच होती. तेथे आम्ही पोहोचलो त्याच दिवशी कलकत्ता शहरावर पहिली बाँबफेक झाली होती. वातावरण नाही म्हटले तरी भयग्रस्त होते. त्याचा परिणाम आमचेवर होऊ नये, म्हणून आम्हाला आमच्या अड्डयावरच डांबून ठेवण्यात आले.....

कलकत्ता बंदरात परत एकदा किनाऱ्याने वाहतूक करणाऱ्या आगबोटीनी आम्ही ब्रह्मदेशाचा किनारा गाठला. तेथून लष्करी ट्रकसनी आम्ही आघाडीकडे निघालो. चहुबाजूनी डोंगर, झाडी व दलदल. डांस व जळवा असे दुहेरी शोषण (रक्ताचे)

'ऑर्डर्स ऑफ दि डे'




अबाउट टर्न !






पीतज्वर, रक्ताची तसेच सार्दी, आंव सदैव सोबत......अशा परिस्थितीत आम्ही प्रत्यक्ष आघाडीवरील आमच्या ठिकाणी पोहोचलो. आमच्यात व दुष्मनात जमिनीचा पाच मैलाचा लांब पट्टा होता. जपान्यांच्या टापूत एक भला मोठा डोंगरही होता. त्यामुळे त्याना आमची टेहेळणी करणे फार सुलभ होते. तसेच त्यांच्या आघाडीवरील उखळी तोफांच्या माऱ्यातच आमचे फील्ड अँब्युलन्स युनिटही होते. साक्षात् मृत्यूच्या साम्राज्यात त्याच्याच हातून जीवित हिसकावण्याचे काम करावयाचे होते.

रात्रीच्या वेळी जपानी विमाने नेमाने तीन चार वेळा डोक्यावर येऊन चौफेर अक्षता उधळल्यागत मशिनगन्सच्या फैरी झाडत. त्यामुळे तेथील संपूर्ण मुक्कामात धडपणे कधीही झोप झाली नाही. विमाने घरघरावयाला लागली की जपान्यांच्या आईमाईचा उद्धार करीत झक्कत खंदकात उडी मारावयाची. पाऊस तर केव्हाही येऊन व्यवस्थितपणे आंघोळ घालून जात असे. त्यामुळे खंदक सुका असला तर "अल्लाचीच खैर" नाहीतर पडले आपले इंदोरी रवडीत. लहानपणी, गाढवासारखा लोळतोस काय? असे कोणी म्हटले तर संतापाने कानाच्या पाळी लालबुंद होत असत... नि आता मोठेपणी? तसे लोळल्यावाचून गत्यंतरच नव्हते.....हे गर्दभराज तुमच्या त्या लोळीतील खरे सुख, खरा अत्यानंद जपान्यानी आम्हाला शिकविला.......



तापात ताप म्हणजे आमचेकडे ना पुरेशा विमानविरोधी तोफा, ना शत्रूचा मुकाबला करण्यासाठी पुरेशी लढाऊ विमाने. पण तेवढेच एक मरण असते तरी परवडते......एकदाच सोक्षमोक्ष लागत असे........ पण तसे व्हावयाचे नव्हते. रात्रीचा प्रत्येक क्षण आम्हाला जीवन मरणाशी लपंडाव खेळणे भाग पाडीत होता. कारण झाडे—झुडपे दाट व किमान पाच फूट उंचीची असल्याने रात्र पडली की जपानी सैनिक लपत छपत आमच्या फॉरवर्ड लाइन्समध्ये घुसून भोसकाभोसकी करीत. त्यामुळे रात्रीचा क्षणन् क्षण अत्यंत सावध रहावे लागत असे. आणि दिवस उजाडला की सुश्रुषेचा व्याप.......त्याही वेळी बॉबिंग, तोफा, मशिनगन्स यांची आग सुरूच......एकूण रात्रंदिवस भाजून निघणे व मरणाच्या धास्तीने जगणे असले ते जिणे. परंतु त्यातही कधी कधी असे काही घडे की त्यामुळे सारा मानसिक ताण नष्ट होऊन निदान चोवीस तास तसे आम्ही आनंदी रहात असू. एकदा एका रात्रीच्या छाप्यात आमच्या कमांडिंग—जनरलचीच गच्छंती ओढविली होती. अर्थातच हल्लेखोर जपानी सैनिकाला मात्र काय कल्पना त्याची......जनरल साहेबांचा ऑर्डली....'साब धोका ऽऽ धोका' असे ओरडतच खाली कोसळला. दुसऱ्याच क्षणी नाईट पायजम्यातील जनरलसाहेबांची स्वारी मोठ्या शिताफीने लपत छपत बाजूच्या एका खंदकात जाऊन पडली.

त्या खंदकातील शिपायाने त्या आगांतुकांचे स्वागत शिवीनेच करावयाचे नाहीतर काय ओवीने....."ठीक है...मैं हूँ जनरल...." हे ऐकताच तेथे जे काही घडले ते प्रत्यक्ष अनुभवणेच इष्ट...खंदकातील साऱ्या शिपायांची पहिल्यांदा बोबडीच वळली....परंतु त्याना त्या अवतारात पाहून जवानानाहि हसू आवरता आवरता मुष्किल बनले. अखेर खुद्द जनरलसाहेबांनी सिगारेट मागितली. आता आली का पंचाईत? सिगारेट! नि तीही खंदकात ओढावयाचीच तर तिचा अंगार कोठेही दिसता कामा नये. त्यातही मागणारा कोण तर सबसे बड़ा साब...पण त्या सायबानेच आपण होऊन तळव्याचे कप्प्यात पहिली सिगरेट शिलगावून दुसऱ्याला दिली. आणि काही मिनिटानी सर्वच जण सिगरेट धुनकीत सायबाचेच तोंडून सारी मजेदार हकीकत ऐकत रंगून गेले..पहाटे मात्र सगळ्यानी ताठ सलाम ठोकले. सायबाचाही रुबाब त्याने परत आणला व तो चालू पडला...

पण इस्से भी और असा किस्सा एका रात्री घडला. गोणपाटे लावून आम्ही मुतारी तयार केली होती. चार बांबूला वेटाळलेले ते टरट रात्रीच्या वेळी वाऱ्याच्या झुळुकीने फडफडू लागले. ते काही वेळ फडफडत असे. वारा थांबला की परत स्थिर होत असे. आम्हाला वाटले की तेथे गनीमच वावरत होते. आणि अर्ध्या तासात सुमारे पाचशे गोळ्या त्या गनिमावर झाडल्या गेल्या. रात्र होती. मिरॅर अंधारी.....पहाटे ते बंदुक बहाद्दर गनिमाच्या मुड्द्यांची चाळण बघावयाला गेले नि....तरटाची झालेली चहादाणी पाहून सर्वच मटकन् खाली बसले.. कमाडंट चिडला पण





रबी पिके निघाली...

खरीप पिकांची उ[illegible]
आता सुरु होणार

संकरित बियाणे वापरून
अन्नधान्य स्वयंपूर्णतेचे
ध्येय गाठू !




आठव्या महाराष्ट्र दिनाची हीच प्रतिज्ञा

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र शासन, [illegible]

त्यालाही हसू आवरले नाही. "ब्लडी स्वाईन्स. . . ." असे काहीसे पुटपुटत परंतु कळत न कळत हसत हसतच तो निसटला.

मरणाशी असे खेळत असतानाच मणीपूर टेकड्यातील युद्ध अधिक घनघोर बनल्याने आमच्या युनिटमधील एक वैद्यकीय पथकाची निवडक टोळी माझ्या अधिकाराखाली निघाली. ती ॲडव्हान्स (बिनीची) पार्टी व आमच्या लढाऊ जवानांची ब्रिगेड एकाचवेळी वाटचाल करू लागली. सर्व रस्ता वळणावळणांचा, डोंगरातून, दऱ्या-खोऱ्यातून गेलेला. अवती भवती दाट जंगल... वाटेत ठिकठिकाणी बांबू व वाळूचे तराफे-ते उडवून दिले की रस्ता बंद—तसल्या वातावरणात आम्ही आसाममध्ये घुसलो. रस्त्यातील चहामळ्यामधील चहाची ताजी ताजी पाने खुडून त्यांचा चहा पिणे हे तर व्यसनच जडले आम्हाला. कारण खरोखरच दुधाविनाही तो चहा फारच चविष्ट लागतो....असो.

दिमापूर ते मणिपूर हा आठ मैलांचा शेवटचा रस्ता अतिशयच धोक्याचा होता. कारण रस्त्याचे दुतर्फी असलेल्या टेकड्यांवरून जपानी सैनिक आम्हाला पाखरासारखे टिपून मारीत होते. आमची पारध करीत होते.

आमच्या इच्छित ठिकाणापासून आठ मैलांवर आम्ही येऊन पोहोचलो. नि रात्र झाल्याने मुक्काम ठोकला. दुसरे दिवशी मुक्कामाला पोहोचतो तर तेथील मंडळी चिंतातुर बनलेली.

आम्ही आदल्या रात्री मुक्काम केलेल्या ठिकाणापासून दोन मैल पिछाडीवरील एक पूल जपान्यानी उडवून दिला होता. त्याची आम्हाला अर्थातच काहीही खबर बात नव्हती. आणि "आम्ही गमावलो" असेच त्या मंडळीना वाटत होते...त्या पुनर्मीलनाचा आनंद काय वर्णावा....

त्याच प्रवासात आणखी एक जीवघेणा प्रसंग ओढवला होता. ब्रिगेड कॉन्व्हॉयचे आघाडीला मी माझी जीप घातली होती. अंगात जवानीची मस्ती. पराक्रमाची ईर्षा. . . . वाटेत एके ठिकाणी गाडी उजवीकडे वळवीत होतो. इतक्यात काय व कसे झाले कोणास ठाऊक, माझी जीप पूर्णपणे वळून ती जवानांकडे मोर्चा वळवून थांबली. समोरील ट्रक्समधील जवान एकदम ओरडले. "डॉक्टरसाब सम्हालो." ऽः क्षणभर मी चकरावून गेलो....जीपच्या बाहेर अलगद उडी टाकून सिगरेट शिलगावली. तोपर्यंत—समोरच्या ट्रक्सही कचाकच ब्रेक दाबल्याने थांबल्या होत्या.

थोड्या वेळाने टाळक्यात प्रकाश पडला. निसरड्या झालेल्या त्या रस्त्यावर माझ्या जीपने एकाएकी 'अबाउट टर्न' केले होते नि त्याचा पत्ताही मला लागू शकला नव्हता. कारण मी त्यावेळी गाडी उजवीकडे वळवीत होतो ना! देवाची कृपाच म्हणून माझी जीप वळली ती डोंगराच्या कडेला.....नाहीतर सदेह वैकुंठवास घडावयाचा....पण दैव तारी त्याला कोण मारी हेच खरे!

तेथून मी आमच्या अड्डयावर पोहोचलो. त्याठिकाणी आघाडीवरील अत्यंत जखमीना विमानाने आणले जात असे व शक्य तसेच आवश्यक उपचारानंतर त्यांची रवानगी बेस हॉस्पिटलमध्ये होत असे. त्यावेळी पेनिसिलीन व ब्लड—प्लाजमा हे प्रकार नवीनच असल्याने, त्यांचा पुरवठा अगदीच थोडा होता. जखमींच्या वाहतुकीसाठी हेलिकॉप्टर्सचा वापर बर्मा—आघाडीवर तरी तोपर्यंत होत नव्हता.

आणि येथेच आमच्या युनिटला लढावे सुद्धा लागले. लढाईतील हालचालीनुसार आम्हाला टेकड्यांची चढउतार करावी लागत असे. एकदा असेच आमचे युनिट एका टेकडीवर चढले. आमच्या टेहेळच्याना तेथे भेटले काही जपानी सैनिक. ते माघार घेत होते. पण दुष्मन समोर आल्याबरोबर झाली गोळागोळी सुरू. आमच्या जवानांजवळ होत्या आपल्या .३०३ रायफली आणि माझ्या कमरेला .४५ पिस्तूल. पण मी वर पोहोचेपर्यंत आमच्या जवानानी त्या जपान्यांचा खिमा करून ते शिखर मोकळे केले. अंधार पडल्याने हातघाई थांबली. परंतु शिखरावर थांबणे धोक्याचे असल्याने सबंध युनिटच्या कर्त्यासवरत्या सी. ओ. ला (मला) किंचित खाली उतरून आसरा घ्यावा लागला.

दरम्यान मी शिखरावर गेलेला सर्वांनी माहित असल्याने माझी शोधाशोध सुरू झाली. तशातच डॉक्टर साहेबांविना जखमीवर उपचार तरी कसे व कोण करणार? त्यामुळे काय वाटेल ते झालं तरी 'मेडिकल्स'ना सुरक्षित ठेवण्यासाठी जवानांचा सदैव आटापिटा सुरू असतो. परंतु पहाटे हळूहळू आम्ही खाली उतरून आलो. तेव्हाच सर्वांना हायसे वाटते. उतरता उतरता दोन जपानी जवान आमच्या तडाख्यात आले. आमच्या समोरील दोनच जवान त्या दोघावर तुटून पडले नि आम्ही ते दोनएकशे यार्डांचे अंतर कापेपर्यंत त्यांचे तुकडे जमिनीत गाडले सुद्धा गेले..

परंतु मणिपूरच्या जंगलानेच माझा घात केला. रक्ताची आंव मला सुरू झाली. . . . . नि तेथून माझी उचलबांगडी झाली ती कायमचीच. त्यानंतर पुन्हा रणांगण दिसले नाही. कलकत्ता येथे उपचार व विश्रांति घेऊन पुन्हा कामगिरीही बजावली आणि यथाकाळ लष्करी पेशातून लक्षावधी लोकांप्रमाणे मुक्त होऊन परत——भाजीपोळीचे घरगुती जेवण सुरू झाले. मात्र रक्ताची आंव जी चिकटली ती बया अजूनही माझा पिच्छा सोडीत नाही...

● ● ●










# प्रगत झाला मानव

**मनुष्य** प्राणी निर्माण झाला आणि त्याला स्थैर्य प्राप्त झाल्यानंतर त्याच्या मनात ईर्षा, आकांक्षा इत्यादि अशांतीजनक परंतु महत्वाकांक्षी भावना निर्माण झाल्या. याच भावनाचे फलद्रूप विशेष म्हणजे मनुष्य आत्म-विश्वासी व लढाऊ वृत्तीचा बनू लागला. मानवजातीची जसजशी प्रगती –उन्नती होऊ लागली व मनुष्य समाज निर्माण होऊन बंधनामध्ये तो राहू लागला तसतसे त्या मानव जातीच्या किंवा मानव-समाजाच्या संरक्षणाचे कार्य हा जातीचा किंवा समाजाचा एक प्रमुख विषय बनला. यातून सांघिक बल, धैर्य हे गुण निर्माण होऊन मोठ मोठी राज्ये व राष्ट्रे निर्माण झाली. या राज्याना व राष्ट्राना एक दुसऱ्यापासून सुरक्षित राहण्यासाठी व स्वत:चे संरक्षण करण्यासाठी ज्या काही निरनिराळ्या युक्त्या-प्रयुक्त्या किंवा योजना आखण्यात आल्या त्यामध्ये शस्त्रास्त्र-निर्मितीला प्राधान्य देण्यात आले. कारण त्यावरच त्या राज्यांचे किंवा राष्ट्रांचे संरक्षण अवलंबून होते व आजच्या विज्ञानाच्या युगात पण ते आहे.

प्राचीन काळी म्हणजे वैदिक काळी हत्यारांचे शस्त्र व अस्त्र असे दोन भेद करीत. तीक्ष्ण व घाव घातल्याबरोबर जखम करणाऱ्या व मृत्यूला कारणीभूत होणाऱ्या हत्याराला शस्त्र म्हणत. मंत्राच्या साहाय्याने किंवा अग्नी, वायु, विद्युत इत्यादि अन्य साधनानी चालणाऱ्या हत्याराला अस्त्र म्हणत. अस्त्राचे दोन प्रकार असत–(१) मंत्र शक्तीने चालणारे व (२) यांत्रिक साधनानी फेकले जाणारे. त्याशिवाय अस्त्राचे मायिक (मयासुराने बनविलेले) व निर्माय असे आणखी दोन प्रकार होते. अस्त्रांमध्ये अग्नियास्त्र, पर्जन्यास्त्र, वायव्यास्त्र, पन्नगास्त्र, ब्रह्मास्त्र, पाशुपतास्त्र व नारायणास्त्र ही प्रमुख होती. ही सर्व अस्त्रे फार भयंकर संहारकारी होती. यातील बहुतेकांचा कौरव–पांडवांच्या व त्यांच्याही आधी झालेल्या देव-दानव, राम-रावण यांच्या युद्धात वापर झालेला होता.

मनुष्य जातीच्या प्राचीन युगाचे पाच भाग कल्पिले आहेत–(१) प्रीचेलीयन (Prechellean) (२) चेलीयन (Chellean) (३) अच्युलीयन (Aechullean) आणि मॉन्स्टेरीयन (Monsterian) (४) निओलिथिक–नवपाषाण युग (Neolithic) आणि (५) ब्रॉन्झ अँण्ड कॉपर–ताम्राश्मयुग (Bronze & Copper) प्रीचेलीयन लोक मोठ्या दगडाची शस्त्रे स्वसंरक्षणासाठी वापरीत असत पण ही शस्त्रे ओबड-धोबड होती. त्यांच्या नंतरच्या म्हणजे चेलीयन युगातील लोकानी आपल्या आयुधामध्ये खूपच सुधारणा केली. विशेषत: आकारात तिसऱ्या युगातील मानवानी आपल्या शस्त्रांच्या आकारात आणि रंगात आणखी सुधारणा केली. पुरा तत्त्व दृष्टीने या तिन्हीही युगातील हत्याराना "कळपाची हत्यारे" असे संबोधिले जाते. कारण ही हत्यारे दोन दगड एकमेकावर घासून बनविली जात. कालांतराने मानवाना हत्याराना धार लावणे व ती गुळगुळीत करणे यांचे ज्ञान प्राप्त झाले. अशा रितीने त्यांनी चौथ्या युगात म्हणजे निओलिथिक (नवपाषाण) युगात प्रवेश केला. या युगातील हत्यारे हलकी होती व त्यांना लाकडाच्या मुठी होत्या. त्यांची दगडी हत्यारे सुंदर रितीने बनविलेली होती. या नंतरच्या पाचव्या ताम्राश्मयुगात हत्यारे बनविण्यासाठी तांब्याचा उपयोग करण्यात आला. भारतामध्ये झालेल्या उत्खननात या युगातील हत्यारे पुष्कळच सापडली आहेत. त्यामध्ये तरवारी, खंजीर, बाणांची टोके, भाले आदीचा समावेश होतो. वरील पाचही युगातील हत्यारांचा युद्धासाठी व संरक्षणासाठी उपयोग होत होता असे समजते.

वरील परिच्छेदामध्ये वर्णन केलेली शस्त्रे त्यांच्या मूळ स्वरुपात होती किंवा विशेष सफाईदार नव्हती. परंतु त्यावरुन मनुष्य जातीची सुरक्षिततावस्था दिसून

श्री. र. पुरोहित





अनुक्रमणिका

## साहेब, जीप आणि कर्नल

कर्नल सुखात्मे यानी आपल्या जीप ड्रायव्हरला (रणबहादूर थापा) फर्मावले, ड्रायव्हर मेजर सब्रवालच्या घरी जा व त्याना लगोलग जीपमधूनच घेऊन ये.

"जी हुजूर" म्हणून रणबहादूर थापा जीप घेऊन गेला तो गेलाच. अर्धातास झाला तास भरला. दीडतास उलटला. कर्नल संतापले. काय फाजीलपणा आहे ? सब्रवालही तिकडेच आणि जीपही तिकडेच.

कर्नल सुखात्मे यानी रागारागाने फोन उचलून मेजर सब्रवालच्या घरचा नंबर फिरविला. "हॅलो मिसेस सब्रवाल स्पीकिंग" ते ऐकताच कर्नल अर्धे हतबुद्ध झाले.

'सब्रवाल कोठे आहेत ?'

'ते साऱ्या सकाळचेच बाहेर गेले आहेत.'

'माझी जीप तेथे आहे ना ?'

'हो.'

'ती कशाला फालतुच थांबवून घेतली.'

'कर्नल साहेब माफ करावे. परंतु रणबहादूरला गाडी परत नेण्यास सांगितले. तर तो म्हणतो साहेबाना गाडीत घालून आणण्याचा हुकूम आहे. साहेब येथे नाहीत म्हणून गाडीही येत नाही.'

ते ऐकून थँक्यू म्हणतच त्यानी रिसीव्हर दाणदिशी आपटला.

–जवानमर्द

येते. तरी सुद्धा हे मानव दगड व ताम्र याच्या पलिकडे गेलेले नव्हते. जी काही सुधारणा केली गेली ती वैदिक काळातील मानवानी आपल्या शस्त्रात केली. कारण त्यांनी पृथ्वीच्या उदरातील लोखंड शोधून काढले व त्यापासून युद्धासाठी आयुधे बनविली.

लोह किंवा लोखंडाची हत्यारे युद्धासाठी वापरण्यास येऊ लागल्यानंतर त्या हत्यारांचे निरनिराळे प्रकार पाडण्यात आलेले दिसतात. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात अशा हत्यारांचे अकरा प्रकार दिलेले आहेत–(१) स्थलांतरीत यंत्रे, (२) अस्थलांतरीत यंत्रे, (३) नांगराच्या फाळासारखी हत्यारे, (४) धनुष्य आणि बाण, (५) तरवारी, (६) पात्यासारखी हत्यारे, (७) चिलखत आणि कवचे, (८) स्वसंरक्षणाची हत्यारे, (९) हत्ती, रथ इत्यादींच्या संरक्षणासाठी हत्यारे, (१०) नाशासाठी उपयोगात येणारी साधने (तेले, भस्मे, ) आणि (११) इतर हत्यारे. या उलट अग्नी पुराणात हत्यारांचे जे वर्णन आहे ते सयुक्तिक व व्यवहारी दिसते. या पुराणात युद्धासाठी वापरण्यात येणाऱ्या हत्यारांचे दोन भाग केलेले आहेत–(१) अस्त्रे व (२) शस्त्रे. पहिल्या भागाचे आणखीन् चार भाग केलेले आहेत–(१) यंत्रमुक्त (यंत्रामधून सोडलेले), (२) हातामधून सोडलेले, (३) मंत्रमुक्त (मंत्रांनी प्रेषित केलेले), (४) मुक्तसंघरीत (सोडलेले व परत आणलेले–बूमरँगसारखे). दुसऱ्या भागाचे पण आणखी दोन भाग पाडलेले आहेत–ते असे (१) खड्ग, भाले, वगैरे (२) विगातायुद्धम् (नैसर्गिक). तर वैशंपायन हत्यारांचे चार प्रकार (१) मुक्त (२) अमुक्त, (३) मुक्तामुक्त, (४) मंत्रमुक्त असे होत.

प्राचीन काळात धनुष्य बाणाला फारच महत्व होते. देव दानव, राम–रावण व महाभारताच्या काळापर्यंत, त्याचप्रमाणे भारतावरील अलेक्झांडरच्या काळापर्यंत झालेल्या युद्धात युद्ध-साहित्य म्हणून धनुष्यबाण याना अनन्यसाधारण महत्व होते हे दिसून येते. वैदिक काळात धनुष्य मजबूत व लवचिक दांड्यापासून बनविलेले असे. धनुष्याची दोरी जनावरांच्या कातड्यापासून तयार करीत असत. हे लोक आपले बाण लाकडाचे, शिंगाचे, तांब्याचे किंवा लोखंडाचे बनवित व त्यांना वेग येण्यासाठी पिसे लावलेली असत. बाणांच्या टोकाना वीष लावलेले असे. महाभारत काळातील वीर आपले धनुष्य "कारमुक" लाकडापासून बनवित असत. तर काही वेळेला ती शिंगाची पण असत. धनुष्याची दोरी मूरू गवतापासून बनवीत. बाण सुद्धा वैदिक काळातील लोकासारखे बनवित. क्वचित प्रसंगी हाडापासून तयार केलेले बाण वापरण्यात येत असत. अर्थशास्त्रात धनुष्याच चार प्रकार कौटिल्याने दिलेले आहेत–(१) कारमूक (तालवृक्षापासून तयार केलेले) (२) कोदंड–बांबूचे,(३) द्रून, व (४) धनुस शिंगाचे. अर्जुनाचे गांडीव धनुष्य प्रसिद्धच आहे. धनुष्यांची निरनिराळी नावे महाभारतात आढळतात. धनुष्यांच्या प्रकाराप्रमाणे बाणांचे पण प्रकार आढळतात–वेणू, शर, शलाका, दंडीसन आणि नाराच. या शेवटच्या नाराच बाणानीच रामाने रावणाचा व अर्जुनाने कर्णाचा वध केलेला आहे. या चार प्रकाराशिवाय आणखी बाणांची काही नावे आहेत–भल्ल, अर्धचंद्रा शक्ति व यस्ती.

शस्त्रास्त्रांचे प्रकार दिल्यानंतर त्यांच्या उपयोगाविषयी बघणे अगत्याचे आहे. युद्ध आयुधांचे साधारणपणे दोन प्रकार आहेत–(१) प्रहारात्मक (ऑफेन्सिव्ह) व (२) बचावात्मक (डिफेन्सिव्ह). पहिल्या विभागात भाले, वज्र, गदा, परशु, चक्र, तरवार व बूमरँगसारखे हत्यार यांचा समावेश होतो. वैदिक आर्य भाल्याना ऋष्टी, रंभिनी, शक्ति, सारू, पवीर किंवा पवीख या नावानी ओळखत असत. तर महाभारत काळात त्यांना शक्ति, पत्तीस, ऋष्टी, कूत, कनप अशी नावे होती. याच वर्गात त्रिशूळाचा पण समावेश होतो. त्रिशूळाला पिनांक किंवा शूल शक्ति असे नाव आढळते.

अनुक्रमणिका

वैदिक काळात वज्र हे सर्वात भयंकर शस्त्र होते. इंद्राचे वज्र प्रसिद्ध आहे. त्याच्या सहाय्याने त्याने वृत्तासूराचा वध केला. तसेच भगवान शंकर सुद्धा वज्र-धारी म्हणून प्रसिद्ध आहेत.

गदा हे आयुध आदिमानवापासून प्रसिद्ध आहे. भीम, दुर्योधन, दुःशासन व शल्य हे गदावीर प्रख्यात आहेत. प्रथम हे शस्त्र लाकडाचे बनवित असत परंतु मानवात सुधारणा झाल्यावर ते पूर्णपणे लोखंडाचे बनविले गेले.

कुऱ्हाड किंवा परशु याचा वेदात परशु, पर्सु किंवा स्वाधिती इत्यादी नावाने उल्लेख येतो. हे परशुरामाचे आयुध म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु युद्धात हे क्वचित् वापरले जात असे.

चक्र हे आयुध वैदिक आर्यांना माहित होते पण युद्धात त्याचा कमी उपयोग होत असे. भगवान विष्णूच्या हातातले चक्र सर्वास माहितच आहे.

तरवारीबद्दल माहिती देण्याचे प्रयोज़न नाही कारण हे आयुध नित्य परिचयाचे आहे.

बूमरँग व फास — याच्या शेवटच्या टोकाला एक गाठ असते. ते एक हात रुंद असून त्याला अणकुचीदार टोक असते. गरगर फिरणे, ओढणे व तोडणे या तीन क्रिया यामुळे होतात. आदिमानवांच्या टोळ्या, द्रवीड लोक याचा उपयोग करीत असत. याचा मुख्य उपयोग रथातील वीराना व पायदळातील सैन्याना होत असे. बूमरँगबरोवर येणारे आयुध म्हणजे फास. वेदामध्ये याचा उल्लेख आढळतो. पहा (ऋ. ९, ८३.४, १०, ७३.११). फासाची दोरी धाग्यापासून किंवा मंजु नावाच्या गवतापासून किंवा जनावराच्या कातडयापासून बनविलेली असते. याची लांबी तीस हात असते. फासाचे एक टोक डाव्या हातात धरून मग सर्व भेंडोळे उजव्या हातात घ्यावयाचे. नंतर गरागरा फिरवून लक्ष्याच्या डोक्यावर फेकून त्याला जखडून टाकावयाचे व आपल्याकडे ते लक्ष्य ओढून घ्यावयाचे. आस्ट्रेलियातील आदिवासी लोकांचे हे शस्त्र तर प्रसिद्ध आहे.

इतर आयुधांमध्ये तोमर, मुग्दल, हल (नांगर), शंकू, दंतकंटक, भींदिपाल यांचा समावेश होतो. तोमर हा एक प्रकारचा भाला असून त्याला लाकडी मूठ असते आणि शेवटाला आकडा (हूक) असतो. याला वीघ लावलेले असते. मुग्दल लोखंडाचे असते. हल (नांगर) लाकडाचे असून त्याचा फाळा लोखंडाचा असतो. याच्या जोडीला मुसळ असते. नांगराने ओढावयाचे व मुसळाने ठोकून काढावयाचे. श्रीकृष्णाचा वडील बंधु बलराम याचे हे हत्यार प्रसिद्ध आहे. त्यावरून त्याला हलधर हे नामाभिधान पडले होते. दंतकंटक हे काटयासारखे आयुध असून ते लोखंडाचे बनविलेले असते. ते टोकाला रुंद आणि शेवटाला पातळ असते. भींदीपाल हे अत्यंत जड असे आयुध असून ते शत्रूवर क्षेपणास्त्रासारखे फेकतात.

बचावात्मक आयुधात चिलखत, शिरस्त्राण, हस्तघ्न, कवच यांचा उल्लेख वैदिक काळात आढळतो. कौटिल्याच्या अर्थशास्त्रात शरीराच्या प्रत्येक भागाच्या रक्षणासाठी स्वतंत्र आयुध आढळते. जसे—लोहजालीक, पट्टा, कवच आणि सूत्रक. डोक्यासाठी शिरस्त्राण, मानेसाठी कंठमाण, धडासाठी कुर्पाश, गुढग्यापर्यंतच्या भागासाठी कंचुक, पायदळातील व अश्वदलातील वीराना ढाली असत.

प्राचीन युद्ध साहित्यात किंवा सामुग्रीत विषारी वायु, उकळती तेले, तापलेली वाळू व लोखंडाचे गोळे, विषांनी भरलेली भांडी, सर्प यांचा सर्रास उपयोग होत असे. यांच्या उपयोगाविषयी भारतीयाना फार पूर्वीपासून ज्ञान होते असे आढळून येते. हे साहित्य हत्तीकडून फेकत असत. पायदळातील सैन्ये सुद्धा याचा वापर करीत असत.

प्राचीन युद्धात सैन्य रचनेला फारच प्राधान्य होते. या रचनेला व्यूहरचना म्हणत असत. व्यूहरचनेचा विषय युद्ध साहित्यात जरी अंतर्भूत होत नसला तरी युद्धाचे मुख्य अंग म्हणून याचा उल्लेख टाळता येणे शक्य नसल्याने त्याबद्दल थोडक्यात माहिती देण्यात येत आहे. वेदकाळात व महाभारत काळात जी युद्धे झाली त्यात या व्यूहरचनेविषयी खूपच माहिती मिळते. कौरव पांडवांचे जे युद्ध झाले त्यामध्ये कौरव सेनापतींनी दररोज आपल्या सैन्यामध्ये कोणती व्यूहरचना केली होती याबद्दलची माहिती महाभारतात आलीच आहे. सर्प, चक्र, सूचि, माला गरुड, मकर, शकट, दण्ड, खलक, काक, सिंह, इत्यादी व्यूहाचे प्रकार आहेत. या प्रत्येक व्यूहाची रचना कशी असावी, सैन्य कोठे ठेवावे, राजाचे स्थान कोठे असावे, सेनापतीने कोणत्या जागी उभे राहावे. याबद्दल अग्नीपुराण, शुक्रनीति व वैदिक वाङमय यामध्ये आपणास माहिती मिळते.

असा आहे हा प्राचीन युद्ध साहित्याचा व त्यांच्या वापराचा थोडक्यात इतिहास विज्ञानाच्या आजच्या युगात या आयुधाना आता महत्व राहिले नाही ही गोष्ट खरी आहे. तथापि व्यूहरचनेविषयी जे थोडक्यात दिग्दर्शन केले आहे ते उपयुक्त आहे असा भरवसा वाटतो. ●●●










# इथे ओशाळला मृत्यु—

**प्रा.** वसंत कानेटकर यांचे हे नवे (व दहावे) नाटक आजच्या नाटककारातला एक भाग्यवान व यशस्वी नाटककार म्हणून कानेटकरांचा आवर्जून उल्लेख करायला हवा. 'रायगडाला जाग येते' ह्या नाटकाने जरी त्यांना यशाची पावती दिली असली तरी त्या आधीच्या वेडयाचे घर उन्हात, देवांचे मनोराज्य व प्रेमा तुझा रंग कसा ह्या नाटकांनी एक आगळ्या प्रतिभेचा नाटककार म्हणून कानेटकरांनी जाणकार रसिकांचे लक्ष मात्र स्वत:कडे वेधून घेतले होते खास. 'रायगड' नंतरची त्यांची मत्स्यगंधा, अश्रूंची झाली फुले, आणि लेकुरे उदंड झाली ही नाटकेही 'यशस्वी' झाली आहेत. 'लेकुरे' उदंड झाली तरी त्याचे प्रयोग 'उदंड' होणार नाहीत असे काही टीकाकारांचे मत होते. पण परवा १२ एप्रिलला त्याचा १०० वा प्रयोग झाला आणि सारी भाकिते खोटी ठरली आहेत. 'इथे ओशाळला मृत्यू'चे सारे प्रयोग 'हाऊसफुल' होत आहेत (अगदी पहिल्या प्रयोगापासून) ही गोष्ट 'कानेटकर' ह्या नावाने निर्माण केलेला विश्वास सूचित करते.

शिवपुत्र संभाजीचे आत्मबलिदान हे मराठ्यांच्या इतिहासातले एक तेजस्वी व भव्योदात्त प्रकरण! महाकाव्याचा व महान शोकांतिकेचा तो विषय! 'रायगडा'तच कानेटकरांची संभाजीशी जानपछान झालेली होती. कानेटकरांच्या प्रतिभेला भव्योदात्ताचे महान आकर्षण आहे हे त्यांच्या 'रायगड, मत्स्यगंधा'ने सिद्ध केले आहे. इतिहास–पुराणाच्या 'स्थूला'तले 'सूक्ष्म' त्यांना गवसते आणि ते 'सूक्ष्म' जेव्हा नाटयरूप घेते तेव्हा एखादा शिवाजी, संभाजी, भीष्म साकारतो. 'रायगडा'त त्यांनी शिवाजी–संभाजी नात्यातली वेदना बोलकी केली. 'मृत्यू'च्या ह्या अमरगाथेत त्यांनी 'तेजस्वी' व 'लौकिका'च्या पलिकडे जाणारा संभाजी उभा करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या विषयाचे आव्हान रायगडाइतकेच मोठे होते. माझ्यामते जास्त मोठे होते. कारण असे की जो असामान्य त्याग, जे भव्योदात्त बलिदान करायला संभाजी सिद्ध होतो त्या मागच्या प्रेरणांचा शोध घेणे, त्यांचा अन्वयार्थ लावणे अगत्याचे होते. 'रायगड'मुळेही अंतर्मनातली आंदोलने टिपण्याची कानेटकर यांची शक्ति सिद्ध झाली होती. आणि 'रायगड आणि मृत्यू' ची तुलना पदोपदी होणार हीही भीति होतीच. दायित्व मोठे होते. आव्हान भव्य होते. कानेटकरांमधले नाट्यकाव्य आणि तत्वज्ञान ह्या दोघांनाही हे आव्हान होते.

साधले काय काय? 'रायगड'प्रमाणे ह्या नाटकात जो संघर्ष आहे तो अंतर्मनातला नाही. संभाजीच्या व्यक्तित्वाचा जो आलेख त्यांनी रायगडात गृहित धरला आहे, त्याचाच उत्तरार्ध प्रस्तुत नाटकात असला तरी 'संभाजी'च्या स्वगताचा, बलिदानाचा भाग सोडला तर ह्या नाटकात प्रामुख्याने नजरेस भरतो औरंगझेब. ह्या नाटकातल्या साऱ्या व्यक्तिरेखात अत्यंत ठसठशितपणे मनावर ठसते ती ही व्यक्तिरेखा! आजवरच्या नाटकात (राजसंन्यास–बेबंदशाही) औरंगझेबाच्या व्यक्तिरेखेला हे परिमाण कधी लाभलेले नव्हते. बारीक सारीक तपशीलाचा कुशल वापर करून कानेटकरांनी औरंगझेब रंगविला आहे. क्वचित प्रसंगी हे संभाजीच्या जीवनावरले नाटक नसून औरंगझेबाचेच नाटक आहे असे वाटायला लावण्याइतपत तो तपशील आलेला वाटतो. पण कानेटकरानी हे कां केले असावे? मला तरी असे वाटते की, ह्या नाटकाचा एकूण जीव तसा लहान आहे. मध्यवर्ती घटना दोनचारच! शिर्के यांचा संघर्ष, त्यातून झालेली फितुरी, संभाजीला संगमेश्वरी झालेली अटक, त्याचे स्वगत आणि बलिदान. बस्स!! शहाजादा अकबरला दिलेला आसरा हे निमित्त होते. पण अंगभूत संघर्ष दिल्ली विरुद्ध रायगड असाच होता. शिवरायांपासून चालत आलेला. ह्या संघर्षाला 'धार' देण्यासाठी 'कडवा' औरंगझेब व 'कडवे' संभाजीराजे रंगविणे भाग होते. आणि ती धार देण्यासाठीच कानेटकरांनी संभाजीच्या स्वगतात काही मूलभूत पण 'तत्वज्ञ' विचार मांडले आहेत. शरीर विचार ही औरंगझेबाच्या बुद्धीची 'झेप' होती तर त्यापलिकडच्या सत् आणि चित् शक्तींचे संभाजीला आकर्षण होते. संभाजी त्या बैठकीवर गेला म्हणूनच शरीराच्या सर्व यातना त्याने न किंचाळता सहन केल्या. "नैनं छिन्दति शस्त्राणि, नैनं दहति पावकः" हा छाप सिद्धान्त मनोमन पटल्याने शरीर जिंकून, संभाजीला गुलाम करून पायी आणू इच्छिणारा औरंगझेब आणि शरीराची वस्त्रे फेकून देऊनही लोकोत्तर आनंद मिळविणारा संभाजी असे भव्योदात्त स्वरुप कानेटकरांनी ह्या संघर्षाला दिले आहे. जे जे भव्य–दिव्य त्याचे संभाजीला आकर्षण होते. जे जे सुंदर त्याचेही त्याला आकर्षण होते. आणि उत्कट, मनस्वी असाच त्याचा स्वभाव होता. त्यातूनच त्याचे अवघे जीवन घडले. आणि संपले. कानेटकरांना अभिप्रेत आहे तो हा संभाजी. ते एक तेजाचेच बाळ होते. सेतुमाधवराव पगडींनी आपल्या पुस्तकात त्याच्या संबंधी जे लिहिले आहे ते कानेटकरांना अभिप्रेत आहे. सतत नऊ वर्षे संभाजीने लढत दिली. विश्रांति घेतली नाही (आणि घेतली तेव्हाच तो असावधपणे व फितुरीने सापडला) 'मृत्यूची झुंज' हे त्याचे व्रत होते. तेज डोळे दिपवीत होते. त्यामुळे माणसे जवळ आली नाही. आली ती समजू शकली नाहीत. रायगडमध्येही 'संभाजी' 'एकाकी' होता. 'मृत्यू' मध्येही त्या एकाकीपणातूनच एक भव्य हौतात्म्य अवतरले. दोन प्रवृत्तींचा संघर्ष व प्रकृतींचा संघर्ष स्पष्ट करण्यासाठी इथे औरंगझेबाला उठाव दिला गेला असावा असे मला वाटते. ह्या संघर्षामुळेच संभाजीचे प्रस्तुत नाटकातले स्वगत वेगळे व अधिक उत्कट झाले आहे. संभाजी म्हणतो "पण भय वाटतं येसू. थोडं भय वाटतं. मरणाचं नव्हे, भय वाटतं या कातडीचं.








भयं वाटतं ह्या रक्तमांसाचं———देवा, कातडी, रक्त, मांसापेक्षा माणूस नुसत्या तरल, वायवी वैदेही आत्म्याच्या रूपानं अवतरता आणि वावरता तर ही दुनिया किती समर्थ, किती सुंदर झाली असती, नाही! —या रक्त मांस कातडीची जिद्द तर पाहू. करून करून औरंगझेब ह्या साडेतीन हात देहाचे कोणकोणते हाल करील? – ह्या इहलोकाचा निरोप म्हणजे अखेरीस स्वतःचाच निरोप. शुभास्ते पंथानः!! —पोटार्थी लाकुडतोड्या फांद्या तोडतो म्हणून वटवृक्षाने कधी आकान्त केला आहे का?१... अशी कितीतरी सुंदर, काव्य–तत्वज्ञानपर वाक्ये ह्या स्वगतात आहेत. अखेर ते शरीर पायाशी विव्हळत, किंचाळत येईल ही होती औरंगझेबाची प्रतिज्ञा आणि साऱ्या वेदना पचवूनही मन अजिंक्य व अमरच राखीन ही होती शंभूराजांची जिद्द ! नाट्यवस्तु लहान. पण संघर्ष मात्र मोठा अशी ही नाटकाची अवस्था ! ह्या नाटकातली येसूबाई ही काही ठिकाणी 'डॉमिनंट' दाखविली गेली आहे. 'आज्ञा' देण्या-इतपत (तीही खुद्द राजांना) ती 'डॉमिनंट' आहे. ती जर धूर्त, राजकारणी व द्रष्टी होती तर शंभूराजे नाकारीत असताना व गणोजी शिर्के यवनांना मिळाल्याचे कळूनही ती राजांना संगमेश्वरी पाठवायला कां सिद्ध होते? शिवरायांचे 'राजकारण' पाहिलेली ही स्त्री प्रल्हाद निराजींनी तडजोडीचा मार्ग सुचविताच शंभूराजांच्या तडफेने कां संतापते? वस्तुतः ती शांत, विचारी, संयमी व राजकारणी होती व वेळप्रसंगी राजकारणात अशी पावले टाकावी लागतात हे तिला ठाऊक असताना ती अशी कां संतापते ? 'शाहू' राजांचा 'घोडा' हा रायगडमधील शंभू-राजारामांच्याच घोड्याची पुनरावृत्ति वाटतो. ते स्वप्नदृश्यही चांगले आहे. पण ते नाटकात 'चपखल' वसत नाही. गणोजी शिर्के यांच्या पश्चात्तापाचा प्रवेश असाच 'पॅच' सारखा (चांगला असून वाटला. संभाजीचा औरंगजेबाच्या दरबारातला प्रवेश नाट्यदृष्ट्या अतिशय प्रभावी वाटला, तर त्याच्या मृत्यूचे सूचन चंद्रकलेच्या 'कला'ने घेतल्याने व त्याचे निवेदन बरेचसे 'वृत्त-पत्रीय' झाल्याने त्या प्रसंगाची उत्कटता व गांभीर्यही मनावर अपेक्षित परिणाम करू शकलेले नाही. स्वगताने भारावलेला व औरंगजेबाचे भेटीतल्या शंभू दर्शनाने दिग्मूढ झालेल्या प्रेक्षकाच्या मनावर 'मृत्यू'चा खोलवर व भारावून – चक्रावून टाकणारा परिणाम होतच नाही. ह्या नाटकातले यवन सरदार–सेनापति 'जी हाँ – हुजूर' म्हणण्यापलिकडे फारसे काही करीत नाहीत. (करतात ते सारे औरंगजेबाचे हेर–पडद्यामागेच) त्यामुळे झाडून सारे बुद्दू व क्रियाशून्य वजीर–वतनदार त्याने भोवती जमा केले होते की काय अशी शंका येते. इतक्या खुनशी, धूर्त, कावेबाज, राजकारणी बादशहाने अशी माणसे भोवती जमविली असतील? इतिहास म्हणून नव्हे तर नाटक म्हणूनही हे खटकते. प्रल्हाद निराजीसमोर येसूबाई राजांची स्थिति ज्या 'साभिनय' पद्धतीने मांडते तेही विरस करते. येसूबाई पोच ओळखून बोल-णारी–वागणारी बाई होती–म्हणूनच ते वागणे निदान मला तरी सुसंगत वाटत नाही.

'कवि कलश' (वा कलुषा कवजी) ची व्यक्तिरेखा रंगविताना कानेटकरांनी नवा रंग दिला असला (नवा इतिहास) तरी त्याच्या व्यक्तिरेखेतले 'काव्य' व त्याचे 'कविमन' मात्र प्रस्तुत नाटकात जाणवत नाही. एक दोन ठिकाणी त्याच्या तोंडी काव्य आले आहे. पण संभाजीने (व येसूनेही) भारावून जावे असे व्यक्तित्व काही नाटकात गवसत नाही. जी शेरशायरी वापरली आहे ती पाहून व ऐकून खुद्द शंभूराजे 'वाहव्वा!' म्हणत असले तरी प्रेक्षकांच्या तोंडून मात्र उत्स्फूर्त 'वाहव्वा!' काही येत नाही. अपवाद एकच 'तु अ तपतेज निहारक, तरवत तज्यो अवरंग!' ह्या ठिकाणी मात्र जागा योग्य व दोहा योग्य व चपखल वाटतो. एरवी हा कवि 'पदरी' बाळगला आहे असाच भास होत राहतो. ह्या नाटकातले संताजी, धनाजी संताजी–धनाजी वाटत नाहीत (म्हणजे पात्रांची निवड) औरंगझेबाची भूमिका करणाऱ्या प्रभा-कर पणशीकर यांची पहिल्या अंकातील बोलण्याची ढब 'अश्रूंची झाली फुले' तील प्रोफेसरची आठवण करून देत होती. पण पुढे मात्र ते मजा आणतात. डॉ. काशीनाथ घाणेकर हे तर कानेटकर म्हणतात त्याप्रमाणे संभाजीने झपाटलेले झाडच! ते संभाजीच्या व्यक्तित्वातली रेषान् रेषा अभिव्यक्त करतात. कमी पडते ते त्यांचे व्यक्तित्व! (ह्या संदर्भात मला बेबंदशाहीतले संभाजी–नानासाहेब फाटक आढळतात. सूर्यकांताची याद येते) पण ती सारी उणीव ते उलट अभिनयाने, स्वच्छ वाणीने व सुयोग्य अशा हालचालींनी भरून काढतात. संभाजीची 'स्टेचर' ते कायम राख-तात. आणखी मनात घर करून राहते ती सौ. सुधा करमरकर यांची येसू. डॉ. घाणेकरांना शोभेशी येसूबाई त्या रंगवितात. सुधा-बाईच्या वाणीलाच एक प्रकारचा 'ऱ्हिदम' आहे. वाणी स्वच्छ आहे. शब्दांना वजन आहे. उच्चारणात जाण आहे. दोन प्रवेशांचे शेवट मोठे वेधक आहेत. पहिल्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशात संभाजी तडफेने निघून जातो. येसूबाई म्हणते "स्वारीचे हे रूप, ही जिद्द आणि हा आवेश पाहिला की कवीजी, जीव ओवाळून टाकावासा वाटतो!" दुसऱ्या अंकातल्या पहिल्या प्रवेशाच्या शेवटी येसू म्हणते "वख्त गुजरलाच तर हाती समशेर घ्यायलाही आम्ही कचरणार नाही" ती निघून जाते. संभाजी म्हणतो, "कवीजी, हिचे हे रूप, ही जिद्द, हा आवेश पाहिला की, जीव ओवाळून टाकावासा वाटतो." संभाजी–येसूबाई यांची उत्कट प्रीति 'संयमी' प्रवेशांनी चांगली रंगविली गेली आहे. पण राजमंडळ, सरदार ह्यांना मात्र एका (काळ्या) रंगात रंगवितात मात्र स्थूल चित्रणाचा दोष पदरी आला आहे. राजा व येसूबरोबर, बाकी सारे चूक असा प्रकार दिसतो. ती सारी माणसे तद्दन मूर्ख व राज्याची चिंता नसलेलीच होती का? मग शिवाजीने त्या साऱ्यांना भोवती बाळगले ते का? यात राजांना अन्याय होतो की नाही? जाऊ द्या झालं.

शंभूराजांची ही तेजस्वी गाथा व गणोजीच्या तोंडचे सूचक स्वगत हा जमेचा भाग आहे. मराठ्यांच्या इतिहासाचे एक बोचरे शल्य गणोजीच्या तोंडून नाटककाराने प्रभावीपणे वदविले आहे. महाराष्ट्राचा इतिहास पराक्रम आणि क्षुद्रता; तेज आणि फितुरी ह्यानी भरला हे सत्य आहे. गणोजीची वेदना आजच्या महाराष्ट्रालाही लागू आहे. मला तो भाग हृद्य वाटला. शरीरावर विजय मिळविणारा आणि अंती हरून (व मरूनही) विजयी झालेला संभाजी (व त्याचे तत्वज्ञान) मला आजच्या ऐहिकाने-(च) बरबटलेल्या जगात मोलाचे वाटते. हृद्य वाटते. समर्थ विषय होता. कानेटकरांचा प्रयत्न संपूर्णतया यशस्वी झाला आहे असे म्हणता न आले तरी तो फसला असे मला तरी वाटत नाही. पार्थिवाच्या पलिकडचे काहीतरी पाहण्याची झेप ह्या नाटककाराकडे आहे असे मला वाटत आले आहे. शिवाजी, भीष्म आणि आता संभाजी ह्या तीन मोठ्या व्यक्तिरेखा कानेटकरांनी मराठी रंगमंचाला दिल्या आहेत.

—आता लक्ष वेधले आहे ते 'तुझा तू वाढवी राजा' ह्या नाटकाकडे!!

**चित्रगुप्त**

दीपावलीची



# शिवसेनाप्रमुख बाळ ठाकरे–

चमत्कारांचे युग संपलेले नाही. आणि चमत्कारांची दुनिया घडविणारा ब्रह्मदेवही शांतपणे झोपलेला नाही. विश्वास ठेवा मंडळी–बाळ ठाकरे आणि शिवसेना हा एक (आधुनिक) चमत्कार आहे असे मी तरी मानीत आलो आहे. चमत्काराला नमस्कार करणारी सर्वसाधारण दुनिया. पण चमत्कार असा अचानक आणि अकल्पितपणे चालत येईल अशी मात्र माझीच काय पण ठाकरेजींना ओळखणाऱ्या कुणाचीच कल्पना नव्हती. कारण ठाकरेजींना वृत्तपत्रीय वारसा 'पैतृक' पद्धतीतून आलेला असला तरी त्यांच्या हातातला कुंचला ही त्यांची 'स्वायत्त' कमाई आहे. आणि 'शिवसेना' ही त्यांची नवी कमाई तर चमत्कारातच जमा होण्यासारखी आहे.

श्री. बाळ ठाकरे ह्यांचा माझा परिचय झाला तो १९४८–४९ च्या सुमारास. 'नवशक्ति' दैनिकात त्यावेळचे संपादक प्रभाकर पाध्ये यांच्याकडे काही साहित्यविषयक कामामुळे जावे लागे. तेथे असलेल्या अनेकांची नावे ऐकून होतो. मग परिचय होत गेले. "पाईप ओढीत शांतपणे बसलेले, शेलाटया बांध्याचे, चष्मा घातलेले गृहस्थ दिसताहेत ते बाळ ठाकरे" कुणीतरी कानात सांगितले. आणि 'बाळ ठाकरे' ह्या नावाने येणाऱ्या व्यंगचित्रांकडे पाहण्याची एक नवी दृष्टि मला चटकन गवसली. ठाकरे यांच्या 'हाती' असलेल्या शक्तीची जाणीव तेव्हाही मला होती आणि आज तर त्या शक्तीने केलेले अनेकविध 'चमत्कार' तमाम मराठी माणूस पहात आहे. ठाकरे यांच्या संबंधी मी जेव्हा विचार करतो तेव्हा तेव्हा मला कै. लोकमान्य टिळकांच्या एका वाक्याची आठवण येते. मी राजकारणी झालो नसतो तर मी 'गणिती' झालो असतो. माझी अशी ठाम श्रद्धा आहे की 'शिवसेनाप्रमुख' बाळ ठाकरे यांनाही 'परिस्थितिवश' राजकारण करावे लागत आहे. त्यांची श्रद्धा आहे ती त्यांच्या कुंचल्यावर आणि त्यातून अभिव्यक्त होणाऱ्या कलेवर! ठाकरे यांचे व्यक्तित्व कलाकाराचे आहे. 'राजकारणा'चा मुखवटा गळून पडला तर उरतील सुविख्यात व्यंगचित्रकार बाळ ठाकरे. रेखेरेखेतून भावांचे लेणे अभिव्यक्त करणारे ठाकरे. कलेचे देणे व लेणेही मोठे. त्यामानाने 'राजकीय' नेतृत्वाला आवश्यक असणारी प्रकृति (तशी) यथातथाच! पण 'महाराष्ट्र देशी' एके दिनी चमत्कार जाहला आणि अन्याय वर आसूड उगारणारी शिवशक्ति ठाकऱ्यांच्या रूपाने उभी राहिली. शिवसेना आणि तिचे नेते बाळ ठाकरे हा आजचा परवलीचा शब्द झाला आहे. भल्याभल्यांची व बडयाबडयांची झोप उडविण्याची किमया ह्या शेलाटया शिपायाने केली आहे. अनेकांना चकित केले आहे. विचारात टाकले आहे. एक नवे नेतृत्व ठाकऱ्यांनी 'स्वकष्टाने' उभे केले आहे. 'स्वतंत्र'पणे उभे केले आहे. ह्या नेतृत्वाला पूर्वीचा 'नेत्रदीपक' वारसा नाही. परंपरा नाही. इतिहास नाही. नेतृत्वाचे मूलभूत लेणेही लाभलेले नाही. आणि तरीही ते नेतृत्व आज अनेक चमत्कार घडवीत आहे ही गोष्ट नाकारता येणार नाही. केवळ पैशाने ही असली कामे घडतील? पैशाने वर्षानुवर्षाची कम्युनिस्टांची तपश्चर्या मातीमोल करून टाकता येईल? पैशाने भाषिक 'फॅनॅटिसिझम्'ला (दक्षिणेतल्या) काटशह देता येईल? चित्रपटांवावतचा 'हट्ट' उडवून लावता येईल? पैशाने ठाणे, मुंबईतल्या निवडणुकात नेत्रदीपक यश मिळवता येईल? मग काँग्रेस हा तर 'श्रीमंत' पक्ष! आणि मुंबई तर वनिकांची. मग शिवसेना–प्र. स. प. ला ५३ जागा कशा मिळाल्या? तेव्हा 'पैसा' हे उत्तर खरं नाही. ठाकऱ्यानी एक नवी 'अस्मिता' पेरली आहे. त्याआधी वर्ष दोन वर्ष ते 'मार्मिक' मधून 'खतपाणी' करीत होते. मातीचा अंदाज घेत होते. स्वतःच्या ठिकाणचा 'विश्वास'ही चाचपून पहात होते. 'वेदना' गवसली होती. फुंकर हवी होती. 'शिवसेने'च्या रूपाने ती मारली गेली. मराठी माणसे त्या झेंडयाखाली जमली. एक नवे दृश्य दिसले.

ठाकरे ह्यांची वक्तव्ये मी वाचतो. लाखालाखांच्या सभा मी पाहिल्या आहेत. अखिल भारतीय तर सोडाच. पण अखिल महाराष्ट्रीय कीर्तीचीही फार थोडी माणसे ठाकऱ्यांच्या व्यासपीठावर आली आहेत. आणि तरीही ठाकरे आज अखिल भारतीय कीर्तीचे लोकनेते झाले आहेत. 'मार्मिक'चे साहित्यिक लिखाण क्वचित प्रसंगी 'वादविषय' झाले असेलही. पण त्यातली 'व्यंगचित्रे' कधी तशी झाली नाहीत. 'मर्मभेद' हेच त्यांचे उद्दिष्ट होते व 'शिवसेने'चेही नेमके तेच उद्दिष्ट आहे. शांतवृत्तीच्या पण अंतरी धगधगलेल्या ह्या 'मऱ्हाठी' चित्रकारातून एक 'चमत्कार' रूप नवे नेतृत्व निर्माण झाले आहे. ठाकऱ्यांच्या ह्या नेतृत्वाने एक नवे आवाहन (व आव्हानही) मिळाले आहे. कुंचल्याची किमया त्यांनी कितीतरी वर्षे दाखविली आहे. शिवसेनेच्या रूपाने ठाकरे काही नवे करून दाखवीत आहेत. ठाकरे यांची राष्ट्रनिष्ठा व कम्युनिझम विरोध वादातीत आहे. आणि म्हणूनच त्यांच्या नेतृत्वाबद्दल काही वेगळीच आशा मला वाटते आहे. कम्युनिझमचा पराभव हिंदुस्थानातच होऊ शकतो असा माझा विश्वास असल्याने बाळ ठाकरे यांच्या नेतृत्वात ती ग्वाही असल्याने मी त्यांचे अभिनंदन करतो. मुंबई 'विजयाने' त्यांनी एक नवी' मोहीम' मारली आहे; म्हणून मी त्यांचे अभिनंदन करतो.



अनुक्रमणिका

# एक झपाटलेले झाड—

महाराष्ट्रात झपाटलेल्या झाडांची वाण नाही. 'मनस्वी' स्वभावाची माणसे नेहमीच कशाना कशाने तरी झपाटली जातात. माणूस ह्या साप्ताहिकाचे संपादक श्री. ग. माजगावकर हे असेच झपाटलेले झाड आहे. आजच्या स्वार्थपरायण व संकुचित वातावरणात अशी झाडे 'पानझडी'ने वढू लागली असताना हा ध्येयवेडा तरुण काहीतरी घडावे ह्या भावनेने उठतो आणि 'पक्षनिरपेक्ष' अशी जन आंदोलने उभारतो हे तसे विशेषच! उत्कट हृदयातून उत्कट कार्ये उभी राहतात. सेवा घडते. **'माणूस' प्रतिष्ठानची** कल्पना त्यातून निघाली. (Not failure, but low aim is crime) ती कल्पना कदाचित यशस्वी झालीही नसेल. पण माजगावकर 'गुन्हेगार' नाहीत. **श्री. कैलास ते सिंधुसागर** ही कल्पनाही तशीच उत्कट, भव्योदात्त व सर्वत्र (साहेबी) गुलामगिरीत रत होणाऱ्या समाजात ती स्फुरणे हे तर फारच मोठे. श्री माजगावकरांना ती स्फुरली. हेच मी त्यांचे 'सजीव'पण व 'मोठेपण' मानतो. ही कल्पना विनोबांच्या बरोबर राहिल्यानेही (काही काळ) सुचली असेल. पण त्यामागची भावना उत्कट होती. 'स्वतंत्र' होती. सर्वत्र लाचारी व अन्नपरावलंबन ह्याने समाज पोखरला गेलेला असतांना माजगावकरांनी जनजागरणाचे हे कार्य करावे हे मोठेपणाचेच. स्वातंत्र्याचे स्वदेशीकरण वीस वर्षानंतरही झाले नाही हे एक भीषण सत्य! पदयात्रेतून लहान मोठी माणसें हिंडली. 'नव्या प्रतिज्ञा' घेतल्या गेल्या. नवे आवाहन दिले गेले. जे वीस वर्षात घडले नाही ते 'चमत्कारा'सारखे दोन महिन्यात घडून येणार नाही. पण 'हवा' तर उत्पन्न झाली. हे आवाहन महाराष्ट्रातल्या एका झपाटलेल्या तरुणाने करावे हे महाराष्ट्राला अभिमानास्पदच. मार्गाबद्दल कदाचित कुणाचे मतभेद असतीलही, पण हेतूंच्या शुद्धतेबद्दल नाही. अशी झाडे इथे (वनमहोत्सव वा वृक्षारोपणे न करताही) वाढतील तर ह्या देशाचे मानचिन्ह बदलेल. तूर्त मी श्री. ग. मा. चे अभिनंदन करतो.

स्वतंत्र आहोतच. स्वयंपूर्ण होऊ या.

**—आदित्य**

## वाचा आणि विसरू नका

**साहित्य पाठविण्यासंबंधी : साहित्य पाठविताना ते सुवाच्य अक्षरात, कागदाच्या एकाच बाजूने व योग्य ते मार्जिन सोडून लिहिलेले असले पाहिजे. साहित्यासंबंधी निकाल ताबडतोब कळविला जातो. मात्र परतीसाठीं पुरेसे टपाल हंशील नसेल तर ते साहित्य बाद केले जाते. त्यासंबंधी कुठलाहि पत्रव्यवहार केला जात नाही. नापसंत साहित्य परत हवे असेल तर, साहित्य पाठविताना त्यासोबत पुरेसे टपाल हंशील असलेच पाहिजे, याची कृपया नोंद घ्यावी.**

## डॉ. लाला तेलंग यांनी सर केलेलं वैद्यक शास्त्रातील "एव्हरेस्ट"



दोन वर्षापूर्वी एव्हरेस्टवर घडलेल्या तेजस्वी क्रांति-सेनेतील एकमेव महाराष्ट्रीय सदस्य आणि "दीपावली"च्या एव्हरेस्ट जयगाथेचे प्रमुख शिल्पकार डॉ. दत्तात्रय वामन ऊर्फ लाला तेलंग, एम. डी. हे नुकतेच एफ्. आर. सी. एस. ची परिक्षा उत्तीर्ण झाले. ह्या त्यांच्या सुयशाबद्दल आम्ही त्यांचं मनःपूर्वक अभिनंदन करतो.

एस्. एस्. सी च्या वर्गात असतांना लाला पॉलीन्युरायटीसने —एका दुर्धर रोगाने—आजारी झाला होता. आणि त्याचा परिणाम पायावर होऊन त्याला पंगुत्व आले. चार महिने अंथरुणावर खिळून असलेल्या या मुलाने त्यावर्षीची एस्. एस्. सी परीक्षा मात्र बुडविली नाही. जाज्वल्य इच्छाशक्ति, विलक्षण जिद्द व दुर्दम्य इर्ष्या ह्यांच्या बळावर त्याने पडल्या पडल्या अभ्यास करून परीक्षेत उत्तम यश तर मिळविलेच पण पुढे पंगुत्वावरही मात केली व "आज जिंकिला सगरमाथा" असं अभिमानास्पद यश संपादून "पंगुम् लंघयते गिरीम्" ही उक्ती खरी करून दाखवली. ह्याच गुणांच्या योगे अत्यंत कुशाग्र बुद्धीने त्याने आता वैद्यकीय शास्त्रातील सर्वश्रेष्ठ परीक्षा पास होऊन मिळविलेलं सुयशही तेवढंच स्पृहणीय—एव्हरेस्टइतकंच उंच !

लाला आपल्या आईवडिलांचा एकुलता एक. अर्थातच आप्तेष्टांकडून झालेल्या कौतुकाच्या कोंदणात बाळपणापासून वाढलेला. त्याचे वडिल कै. वामनराव तेलंग हेही एक डॉक्टरच. आपल्या पेशात त्यांनी उत्तम यश व प्रतिष्ठा मिळविलेली. एम्. डी. होऊन लाला अमेरिकेत वैद्यकीय नोकरी करीत असताना "हिमालयाची हाक" ऐकून एव्हरेस्ट मोहिमेच्या चाचणीसाठी तो खास हिन्दुस्थानात आला तेव्हा त्याच्या वडिलांना वाटलं होतं— "लवकर एकदाची परीक्षा देऊन मार्गाला लागला असता म्हणजे मी निश्चिंत झालो असतो. एफ्. आर. सी. एस्. च्या ऐवजी एव्हरेस्टचं काय वेड घेतलं पोरानं—!" परन्तु वैद्यकीय विद्येच्या क्षेत्रातही मुलानं "एव्हरेस्ट" गांठलेलं पाहून लालाच्या आई-वडिलांना "धन्य मी, कृतार्थ मी" असंच वाटलं असेल.

ऐन गुढीपाडव्याचा मुहूर्त साधून लाला पास झाल्याची शुभ-वार्ता आली. कुळाला, जातीला अभिमानास्पद अशी गुढी लालानं स्वकर्तृत्वान विलायतेत उभारलेली. त्यामुळे यंदाचा गुढीपाडवा त्याच्या कुटुंबियांना, हितचिंतकांना अपूर्वाईचा वाटल्यास नवल नाही. अशा ह्या मंगल प्रसंगी आम्हीही आमच्या हार्दिक शुभेच्छा व्यक्त करतो——

**—आदित्य**









अनुक्रमणिका



डॉ. मार्टिन ल्यूथर किंग




## एक जखम अन् नवीन येशू, तुझ्या काळजात....

**असं** कविवर्य कुसुमाग्रज आपल्या जालियनवाला बाग ह्या कवितेत म्हणतात. तर 'जमेचिना, बनेचिना, पटेचिना' असं म्हणत म्हणत पुन्हा पुन्हा रणभूमीकडे धावणाऱ्या माणसाकडे पहात कवि यशवंत 'युगंधराचे पालुपद' गातात. युगे गेली तरी माणसातला देव आणि सैतान ह्यांचे हे युद्ध चालूच आहे. 'युनो'च्या रूपाने मधुन मधुन होतो तो आभास! युद्ध की बुद्ध हे द्वंद्व संपले नाही. संपण्याची शक्यता फार कमी!

अमेरिकेतील निग्रो चळवळीचे प्राण व अहिंसात्मक चळवळीचे अग्रदूत म्हणून जगाला ज्ञात असलेले नेते डॉ. मार्टिन ल्यूथर किंग ह्यांचा एका (तथाकथित गोऱ्या) इसमाने बंदुकीने गोळ्या झाडून खून केला. हा खून डॉ. किंग ह्यांचा झालेला असला तरी तो अवघ्या मानव जातीवरचाच कलंक म्हणून मानला जाईल. ते अहिंसक होते म्हणून केवळ नव्हे, तर मानवी समतेच्या तत्वाचे ते महान उपासक होते. पुजारी होते म्हणून! येशू ढसढसा रडेल का की त्यानेच निर्मिलेल्या एका धवलांग माणसाने एका कृष्णवर्णीय 'लेकराचा' हा खून केला आहे. "प्रेम, शांति अन् क्षमा यामध्ये वसतो परमेश" हा येशूचा संदेश त्या पामराने ठोकरला म्हणूनही येशूच्या डोळ्यांना पाणी येईल. येशू अजून रडतच असेल का की तो श्वेतवर्णीय येशूपुत्र अजूनही 'कबुली' (कन्फेशन) देण्यासाठी पुढे आलेला नाही. धावतोच आहे. पळतोच आहे. पापाचे गाठोडे पाठीवर घेऊन चालतोच आहे. डॉ. मार्टिन ल्यूथर किंग यांच्या खुनाबद्दल लिहिताना पुष्कळांनी गांधीजींच्या हत्येशी ह्या प्रकाराची तुलना केली आहे. ही तुलना फार मर्यादित अर्थाने होऊ शकते असे मला वाटते. डॉ. किंग ह्यांचे 'मिशन' वेगळे होते. हत्येचा प्रकार फक्त एक होता. त्यांचे मार्ग एक होते. अहिंसेवर डॉ. किंग यांची श्रद्धा होती. पण गांधी हत्येनंतर जशी हिंसाचाराची प्रचंड लाट महाराष्ट्रात (होय! महाराष्ट्रातच) उसळली तशीच लाट अमेरिकेतल्या प्रमुख शहरी उसळून गेली. दोघांच्या जीवनातली ही समान शोकांतिका!! माणसातल्या 'माणसा'वर डॉ. किंग यांची महान श्रद्धा होती. आणि म्हणूनच 'काळे–गोरे' हा भेद त्यांनी मानला नाही. अमेरिकेसारख्या प्रगत व 'मॉडर्न' देशात ही 'चळवळ' करावी लागावी हे (जगाचे) दुर्दैव. त्यापायी डॉ. किंग यांनी अनेकवार कैद पत्करली. पण कार्य सोडले नाही. आपल्याकडे जसे हरिजनांबद्दल 'कायदे' झाले पण 'मने' बदलली नाहीत. (म्हणून तर साधुसंतांच्या देशात 'हरिजन' मुलांना उभे जाळले जाऊ शकते). अमेरिकेतही 'कायदे' घडले. पण द्वेष झडला नाही. त्या द्वेषाच्या बंदुकीतूनच गोळ्या सुटल्या.

डॉ. किंग गतप्राण झाले.

माणसे मारून 'मिशन' मरत नाहीत. माणसे मारून ध्येयवाद संपत नाही. माणसे मारून तत्वज्ञाने ठार करता येत नाहीत हे जगाला अजून कळायचे आहे. जग ज्ञानी झाले आहे, प्रगत झाले आहे, माणसे चंद्रावर जाऊन पोहचत आहेत. अनेक नवनवीन संशोधने होत आहेत. पण 'खून–हत्या' ह्या विषयात माणसे अजूनही जुनाटच राहिली आहेत असे दिसते. अन्यथा महात्मा गांधी, दीनदयाळ उपाध्यय, डॉ. किंग आदि लोकनेत्यांचे खून होते ना! डॉ. किंग ह्यांचे मृत्युनंतर त्यांची पत्नी श्रीमति किंग व त्यांचे उत्तराधिकारी राल्फ अॅबरनथी यांनी शोकावेग आवरून डॉ. किंग यांचे 'मिशन' हाती घेतले आहे. हे असेच होते. 'जिवंत' माणसांचा इतिहास असाच घडतो. घडत आला आहे. मृत्यूलाही जे मारता येणार नाही, अग्नीलाही जे जाळता येणार नाही, शस्त्रालाही ज्याचा उच्छेद करता येणार नाही असा समतेचा महामंत्र अमेरिकेत (व सर्व जगात) सिद्ध होईल. ज्यांचा ज्यांचा छळ (वा खून) झाला त्या साऱ्या संत महंतानी हे 'देवाचे नाते' जोडले होते. म्हणूनच 'रंजले गांजले' आजवर जगू शकले आहेत. डॉ. किंग यांच्या अंत्ययात्रेला फार मोठी मोठी माणसे उपस्थित होती. सारी अमेरिका (व जग) महामनस्क होईल तर येणाऱ्या 'राजा'च्या हत्या कायमच्या टळतील. अन्यथा महापुरुषांच्या हत्येचे कलंक माथ्यावर मिरवीत मानवतेची निघालेली ही 'धिंड' कधी संपणार नाही. कवि म्हणतच राहतील....

**एक जखम अन् नवीन येशू तुझ्या काळजात!**

मृतात्म्यास सद्‌गति देवो असं तरी मी कोणत्या तोंडाने म्हणू? त्यांच्या मृत्यूने आम्हा मानवांना सद्‌बुद्धि होवो येवढीच प्रार्थना मी करतो.

## हरिश्चंद्राचे 'महान' वंशज

**आम्ही**–याने आमचे शूर सेनानी व सैनिक रणांगणात जे रक्त सांडून आणि बली चढवून, पराक्रमाची शर्थ करून जिंकून आणतात ते आमचे (तथा-







कथित) राजकारण तज्ञ वाटाघाटीच्या टेबलाशी बसून (व जागतिक राजकारणात आपली छायाचित्रे छापून येतात म्हणून तशा 'पोझेस' घेऊन बसत) गमावतात असा (दुर्दैवाने) गेल्या वीस वर्षातला अनुभव आहे. आणि मग हे जे गमावले जाते ते कसे कमी महत्वाचे आहे; हे पटवून देण्यात आमची (तथाकथित) राजकीय प्रज्ञा 'खर्ची' पडते. (एरव्ही तिला काय काम?) मग ते पटवून देणारे आमचे प्रतिशिवाजी यशवंतराव असोत किंवा संरक्षण मंत्री (शब्दाचे हे तर विडंबनच की) सुवर्णसिंग असोत. इंदिराजींचा वारसा तसा नवीन नाही. राष्ट्राच्या भूमीबद्दल 'तिथे गवतही उगवत नाही' माणसेही रहात नाहीत वगैरे 'पंडिती' युक्तिवादाची जन्मसिद्ध 'री' त्या ओढत असतात. नव्या कच्छ प्रकरणी श्रीमति गांधी, ना. चव्हाण आणि स्वर्णसिंग आदि लोकनेत्यांनी जी वक्तव्ये केली आहेत ती पाहिली की, आमची सैन्यदळे आणि लोकनेते ह्यांच्या कृति—व काव्यातली तफावत मन विद्ध करते. शांति हा आमचा 'वुइक पॉइंट' आहे. आणि "शांति ॲट एनी कॉस्ट" ही भारतीय शासनाची पंडित प्रणित प्रतिज्ञा आहे. भूमीबद्दलच्या 'मातृभू' वगैरे भावना आता 'आऊट—डेटेड' झाल्या आहेत. उपयुक्तता वादाचा 'मॉडर्निझम' (वा कम्युनिझम म्हणा हवं तर) आता आम्ही स्वीकारलेला आहे. तोच उपयुक्ततावाद आता सीलोनलाही पटलेला दिसतो. म्हणूनच "नो मॅन्स आयलंड" असलेल्या 'कच्छतिवू' बेटाबद्दल त्यानी भलतीच आपुलकी व्यक्त केली आहे. (कच्छ दिल्यावर कच्छतिवुचे काय!) भलतीच आपुलकी!! आपल्या उदासीन व शेजाऱ्याच्या आधाशी वृत्तीमुळे आपण हजारो चौरस मैलांचे (मूक) दान परकीयांना केले आहे. शांतीला मूकतेचा शाप असतो असे दिसते. भारताची फाळणी ही ज्या क्षणी भारतीय जनतेने मूकपणे स्वीकारली त्याक्षणीच ह्या नवीन दाना, अनुदानांचा जन्म झाला. कारण फाळणीचा जन्मच मुळी शत्रुत्वभावना, परस्पर अविश्वास व "लढके लेंगे हिंदुस्तान' ह्या भावनेतून झालेला आहे. हे सत्य आम्ही कितीही करनखरेपणा करून नाकारले तरी तेच अंतिम सत्य आहे. पाकची निर्मिती हे तुमचे पुण्य असले तरी तुमचा संक्षेप व तुमचा विनाश हे पाकचे "पाक" (याने पुण्य) आहे. पाकची सारी रण व राजनीती ही त्या एकाच तत्वावर आधारली आहे. आणि म्हणूनच आम्ही जोपर्यंत तिथे काही उगवत नाही, ती ठाणी तशी फारशी महत्वाची नाहीत हो. आम्ही गमावलेल्या १० टक्क्यापेक्षा आम्ही राखलेले ९० टक्के महत्वाचे आहेत, आमच्या तत्वाचाच (कसा) विजय झाला आहे हे पटवून देऊन जर टिऱ्या बडवीत राहिलो तर एक कच्छचा भाग देऊन वा काश्मीरचे उदक सोडून ह्या उपखंडात चिरशांतता नांदेल अशी तर आपण अपेक्षा करीत असू तर आपल्याला इतिहासापासून काहीही शिकता आलेले नाही हेच सत्य ठरेल. राजकारणात सारे फक्त 'राजकारणी' (याने — धूर्त स्वार्थी) असतात. कुणीही भाऊ, बहिण, मामा, काका नसतात, हा सिद्धांत महाभारत—रामायणाइतका जुना आहे. पण आम्ही फक्त मार्क्स वाचतो. कापिताल वाचतो. आम्हाला महाभारत वाचायला (व त्यामुळे घडवायला) सवड आहे कुठे? राजकारणात सारे काही 'धर्म्य' असते असे आम्ही ऐकतो. पण एरव्ही 'धर्म' म्हणतात विंचू चावल्याचा अभिनय करणारे आजचे राज्यकर्ते आपण अगदी हरिश्चंद्राचे 'डायरेक्ट' अवतार आहोत असे मानून 'दिल्या शब्दाचे' (आणि त्यामुळे वाढणाऱ्या जागतिक वजनाचे). दाखले देत आहेत. परवा संरक्षणमंत्र्यांचे भाषण ऐकून बॅ. नाथ पैनी जो शेरा मारला तो फार महत्वाचा होता. पाकची बाजू आम्हीच इतक्या प्रभावीपणे मांडली की पाकला वेगळे वकील नेमण्याची गरज नाही. त्यांच्या सरकारी फतव्यातून त्यांनी इंदिरा, चव्हाण, स्वर्णसिंगांची अवतरणे दिली की काम झाले. आमच्या दृष्टीने कुठलाच प्रश्न 'भावनात्मक' राहिलेला नाही. कारण आपले पुढारी नेहमी बुद्धिनिष्ठतेचा दाखला देत असतात. मातृभू-पितृभू, पुण्यभू ह्या शब्दांना असलेला भाव आता संपलेला—निदान ओसरलेला आहे. म्हणूनच बाहेरच्या 'बौद्धिक' लढाईत (रणांगणात जिंकूनही) आम्ही सतत मार खात आलो आहोत. रणशूर सेनानींनी रक्त सांडून हाजीपीर, कारगिल जिंकले व लाहोरला हादरा दिला. पण ताश्कंदच्या टेबलाशी आम्ही भूमीही गमावली आणि आमचा एक तेजस्वी 'लाल'ही गमावला. लडाख, नेफा, तिबेट, काश्मीर ह्यासर्व ठिकाणची 'बौद्धिक' लढाई आम्ही गमावली आहे. आणि भूमीचे दान मुक्तपणे करूनही आमचे लोकनेते आता सांगतच आहेत की जरा 'बुद्धी'ने घ्या. भावनेने नको. ऐहिक दृष्टिकोन, उपयुक्ततावादी दृष्टिकोन स्वीकारला की माणसातला 'माणूस' मरतो. त्याचा होतो पशु! हर्षखेदांच्या पलिकडचा तो होतो. त्याचे बनते यंत्र आणि मग ते म्हणू लागते "तिथे फारसं काही उगवत नाही." हा दृष्टिकोन आला म्हणूनच एकात्मतेचे आवाहन संपले आहे. माणसे भाषेवर तापतात. पण कच्छ वा कछतिवूबद्दल तापत नाहीत. आपल्याच गाड्या जाळतात. पण नव्या पुरुषार्थाचे आवाहन मात्र त्यांना दिसत नाही. कच्छच्या राजेसाहेबांनी आपली वेदना










मांडली आहे. पण राष्ट्रवादाची प्रेरणाच अाज ह्या देशातून संपुष्टात आलेली असल्यानेच गेल्यावद्दल फारशी खंत न बाळगणारी एक 'अति वैश्विक पिढी जन्माला येत आहे. सिंध, पंजाब, बंगाल, सरहद्द, अर्धा काश्मीर, लडाख, लोंग्जु अकसाईचीन नेफाआदि भागांवर झालेल्या आघातांनंतरही जे रक्त 'थंड' च राहिले ते रक्त कच्छच्या ह्या नव्या (व तशा क्षुद्रच–इति महा-मंत्री) दानाबद्दलही थंडच राहिले. शांतता नांदल्याचा आभास उत्पन्न होईल. जगात आपले वजन वाढेल. पुढाऱ्यांची छायाचित्रे "प्रवदा" 'लाइफ'मध्ये छापून येतील. त्यांच्या प्रदर्शनात आपण रंगून जाऊ. "भूमी गेली तरी भावनावश होऊ नका. आम्ही आहोत की!" असा 'बौद्धिक' संदेश वारंवार दिला जाईल व 'दान महात्म्य' ह्या विषयांवर पांडित्यपूर्ण प्रवचने झडतील. आणि सीमेपलिकडे मात्र 'नवे लक्ष्य' शोधण्यात राजकारणी शक्ति व्यग्र होतील. 'नवे लक्ष्य' गवसे-पर्यंत आमेन! शांत रहा जनहो. भाषेच्या प्रश्नावर तापलात तरी चालेल, राष्ट्रध्वज जाळलेत तरी चालेल, गाड्या जाळल्यात तरी चालेल, कुणाचे राजकीय खून पाड-लेत तरी चालेल, पण जगात मात्र आपले वजन वाढलेच पाहिजे. कारण पंडितजी-नंतर शास्त्रीजींनी आतला, संकुचित विचा-रच फार केला. पुन्हा एकदा 'जागतिक' वजन वाढविण्याची संधि कच्छमुळे चालत आली आहे. जन हो! ही संधि दवडू नका. राज्यकर्त्यांच्या पाठीशी उभे रहा (मान ताठ नसलीं म्हणून काय झालं?) मातृभू–पितृभू वगैरे शब्दांचं पिंडदान आपण सिंधु तीरावर कधीच उरकून टाकलं आहे हे तुम्ही विसरलात तरी चालेल. पण हरिश्चंद्राचे वारस असलेल्या थोर पुढाऱ्यांना व राज्यकर्त्यांना कसे विसरता येईल?

## राज्य (साहित्यिक) पारितोषिके

मध्यंतरी बंद झालेली राज्य पारितो-षिक योजना यंदा पुन्हा सुरू झाली (बंद कां झाली व सुरू तरी कां झाली. एकदम पैसा गेला कुठून आणि (असलाच तर) आला कुठून?) एकूण बेस झाले. काही पुस्तकाना त्यामुळे 'न्याय' मिळाला. 'धंदा' न केलेल्या पण (एकदम ग्रेट असलेल्या–पहा वरेचसे टीकालेख) नाटकाला 'द्रव्य' मिळाले. (मौज आहे नाही?) पण एकूण 'वेस' झाले असेच म्हणतो. आता कुठल्याही स्पर्धेचा निर्णय कधीच वादातीत नसतो. काहीना परीक्ष-कच 'वादविषय' वाटतात. (ह्याना काय कळतं वगैरे) पण पुस्तके 'उदंड' आणि बक्षिसे 'थोडी' अशा परिस्थितीत वादा-तीत निर्णय देणे एकूण कठिणच! (राम-शास्त्रीनीही राजिनामा दिला असता) पुन्हा साहित्य कृती बाबत 'नेमके' निकष कोणते लावायचे (आणि कोणी लावा-यचे?) – साराच गोंधळ. पण काहीतरी ठरवावेच लागते. ठरवले जाते. यंदाच्या निकालाबाबत तसा वाद घालायला फारसा वाव नाही. मौज, पॉप्युलरच्या मानाने 'मॅजेस्टिक'ला तेवढा न्याय मिळाला नाही अशी तक्रार शक्य आहे. बाकीचे प्रकाशक महाराष्ट्रात आहेत. तीही मंडळी काही पुस्तके काढतात त्यातली काही खरोखरच 'मौलिक'ही असतात हे 'ललित'वरून कळत असले तरी सचिवा-लयापर्यंत ती पोहचत नसली पाहिजेत... "सर्वाधिकार स्वाधीन" असे स्वरूप त्यामुळेच राहणे अपरिहार्य. पण राज्य-शासनाने अधिक 'व्यापक' बैठकीवर जाणे अगत्याचे आहे असे मला वाटते. ज्या पुस्तकांना बक्षिसे मिळाली आहेत त्यातली काही खरोखरच मराठी भाषेची भूषणे ठरावीत अशी आहेत. युद्धनेतृत्व, ययाति आणि देवयानी, चक्र, अजगर आणि गंधर्व, रक्तचंदन, गुंतागुंत, स्मृतिधन, हाजीपीर, वाद, सर्मापिता ही त्यातली काही पुस्तके. मराठी भाषा विकसित होते आहे. त्यादृष्टीने अनेक नवनवीन 'प्रयोगां'ना वाव मिळाला पाहिजे. त्या दृष्टीने यंदा काही 'शुभ' पावले पडली आहेत. डॉ. मुंजे चरित्र वा क्षेमेंद्र प्रणित औचित्य सिद्धांत व औचित्यविचार ही दोन ठस-ठशित उदाहरणे!! पारितोषिके मिळा-लेल्या सर्वच मराठी लेखकांचे मी अभिनंदन करतो. त्यातले 'दीपावली'चे जे सुहृद आहेत त्यांचे खास अभिनंदन (नावे तरी किती देऊ!)

## "वसुधा" २०० वा अंक–

श्री. वसंतकुमार सराफ यांच्या 'वसुधे'चा २०० वा अंक 'एप्रिल'मध्ये प्रसिद्ध झाला आहे. त्या अंकाचे 'संपादकीय' मला 'हृद्य' वाटले. प्रामाणिकपणाचे वाटले. "मासिक म्हणजे पूर्तता नव्हे. तो एक प्रयत्न असतो." 'वसुधा' चा चेहरा अजूनही कळत नाही म्हणणारांना उद्देशून सराफ म्हणतात, "विशिष्ट प्रवृत्तीच्या लेखकांचे ते मासिक नाही. म्हणून त्या मासिकाला गति आहे. गतीला चेहरा असत नाही." आणखीही त्यांनी बरेच लिहिले आहे. पण ते देत नाही. २०० अंक निघाले. १९५१ साली निघालेले हे मासिक २०० अंक काढू शकले. 'ठसा' न करता काढू शकले. 'गटात' न बसता काढू शकले हेच माझ्या दृष्टीने महत्त्वाचे. मासिकाला चढउतार असणार. लेखन ही जर 'सजीव' प्रक्रिया तर 'मासिक' ही तसे असणारच. 'वसुधा'ने अनेक चांगले लेखक, कादंबऱ्या, एकांकिका, कथा मराठीला दिल्या आहेत हे मान्य करायलाच हवे. ह्या २०० व्या अंकात चंद्रकात बक्षी ह्यांची 'पॅरे फिसिस' ही कादंबरी, जयवंत दळवी, वि. वा. पत्की, शिवाजी सावंत, द. का. हसम-नीस, उद्धव शेळके, यांच्या कथा. श्रीमति दुर्गाबाई खोटे यांचा परिचय इत्यादि भरगच्च मजकूर हे देण्यात आला आहे. सराफ यांनी आपण मासिक धंद्यात कसे पडलो हे सांगितले आहे. अनेक उन्हाळे पावसाळे पाहून त्यानी हा २०० वा अंक काढला आहे. हे 'व्यसन' तसे जबरच. न सुटणारे. गुंतवीत जाणारे. पण तरीही 'सुखद' नशा देणारे. ह्यानिमित्ताने मी 'वसुधे'चे व सराफांचे अभिनंदन करतो. 'वसुधा' आता 'तारुण्यात' आली आहे. हे तारुण्य बहरो हीच इच्छा.

—सारस्वत










[ पृष्ठ १० वरून—जया कोण... ]

मी कर्नलला सलामी देऊन निघतो तोच आमच्या पलटणीतला कर्नलच्या नंतरचा दुय्यम ऑफिसर (Second in Command) मला म्हणाला, "काळजी करू नकोस. तुम्ही पिकेटवर जा. मी साऱ्या कंपनीसाठी ताजं जेवण व पाणी तिथे पोचविण्याची व्यवस्था करतो." इन्फन्ट्री बटालियनमध्ये कर्नलच्या खालोखालचा जो मेजर असतो त्याच्या बहुविध कर्तव्यांपैकी पलटणीच्या खाण्यापिण्याची चोख व्यवस्था ठेवणे हे एक असते. म्हणूनच लष्करी भाषेत सेकंड इन् कमांडला पलटणीची "आई" असे विनोदात उल्लेखिलं जाते. त्याला "थँक यू सर" म्हणत मी माझ्या कंपनीकडे फिरलो.

माझी कंपनी पिकेटची पहाडी चढू लागली व अपेक्षेप्रमाणे पठाणांकडून आम्हाला प्रतिकार व्हायला वेळ लागला. त्यांचे लक्ष आमच्याकडे वेधेपर्यंत आम्ही पहाडीवर त्यांच्याहून उंचावर पोहोचलो होतो. त्यांनी त्या ब्रिटिश कंपनीचा नाद सोडून देऊन काढता पायच घेतला. नशिबाने आमच्या पैकी कोणालाही इजा न होता आम्ही दबकत दबकत हळूहळू, त्या पठाणांच्या वर गोळ्यांचा मारा करीत त्यांना मागे रेटले. अर्ध्या पाऊण तासाच्या चकमकीनंतर ते सर्व पसारच झाले व मी त्या ब्रिटिश कंपनीच्या कमांडरपर्यंत जाऊन पोचलो. एव्हाना सर्वत्र सामसूम झाले होते, व सूर्यास्त व्हायला ठेपला होता.

काही वेळाने पाणी, जेवण वगैरेनी लदलेली तीन चार खेचरे पण येऊन पोचली. ते सर्व उतरवून घेऊन त्याच खेचरांवर जखमी झालेल्या गोऱ्या शिपायाना खाली नाल्यात पाठविण्याची व्यवस्था केली गेली. मग रात्री पठाणानी अचानक हल्ला करून आम्हाला बेसावध स्थितीत पकडू नये या साठी Sentries ची नेमणूक करून तो ब्रिटिश ऑफिसर व मी तीन तीन थंडच चपात्या व जेवणात जी काय भाजी वर आली होती ती खाऊन शांत बसलो. दिवसभराच्या श्रमानंतर थकलेले, एकंदर मागल्या हकीगतींचा आढावा घेत आम्ही दोघेही, रात्र दिवस कधी उजाडेल याची वाट पाहत बसलो.

त्या रात्री झोप येणे अशक्यच होते व दिवसभर श्रम केल्यावर रात्रींच्या कँपमधील गरम जेवणाला पण मी व माझे सर्व सैनिक मुकलो होतो. परंतु जखमी झालेल्या आपल्या सवंगड्याना सुरक्षितपणे खाली पलटणीत जाता आले याच समाधानाने व आनंदाने, कँपमधील आरामाला मुकल्याचा विषाद कधीच नाहीसा झालेला होता. लष्करी जीवनात पाऊल ठेवल्यानंतर आलेल्या या पहिल्याच अनुभवाची आठवण अजूनही माझ्या मनात अगदी ताजीच आहे, व तशीच सदोदित राहीलही.

## विजयाचे कुंकूच बळकट

ऑक्टोबर १९४५ मध्ये आमची बटालियन सुरबायात होती. जपानने हात टेकून दोन महिने होऊन गेलेले होते, पण डच लोकांच्या जाव्हात परतण्यास इंडोनिशियन्सचा विरोध असल्याने सुरबायात रणकुंड पेटलेले होते. आमच्या बटालियनची एक कंपनी एक दिवस अडचणीत सापडली व शत्रूच्या चारीबाजूनी होत असलेल्या गोळ्यांच्या वर्षावाच्या कोंडीत सापडल्याने त्या कंपनीतील कोणालाच हालचाल करणे अशक्य झालेले होते. 'विली' विलसन तिचा कंपनी कमांडर होता. त्याने वायरलेस सेटवर आमच्या कर्नलला सांगितलेन् की "वेळ आणीबाणीची आहे. ४–५ शिपाई जखमी झालेले आहेत. त्यातील एकाला जर लवकरच इस्पितळात उपचारासाठी नेता आले नाही तर तो जगणे कठिण आहे. माझी कंपनी कोंडीत सापडलीय, तुम्ही कोणाला तरी वाहेरून कोंडी फोडून मदतीला पाठवलत तरच या जखमी माणसाना तरी इथून हलविता येईल. आमचा दारुगोळा पण बराच कमी झालाय. तेव्हाचे कोणी मदतीला पाठवाल त्याच्याबरोबर रॅशन्स बरोबरच तो पण पाठवा."

विलीच्या कंपनीला कुमक पोचविण्याची ही कामगिरी माझ्या कंपनीवर

### कै. गोपाळकृष्ण भोवे स्मारक निधी समिती

**कै. गोपालकृष्ण भोवे यांच्या. अनेक मित्रांनी व हितचिंतकानी आम्ही जाहीर केलेल्या विनंतीनुसार भोवे स्मारक निधीसाठी यथाशक्ति सहकार्य देऊन देणगीच्या रक्कमा निधी समितीकडे पाठविल्या आहेत. ता. १५ एप्रिल पर्यंत आलेल्या देणगीदारांची नावे संधन्यवाद प्रकाशित करीत आहोत.**

| | |
|---|---|
| १) श्री. राजदत्त फोटोग्राफर्स, मुंबई १ | १०१–०० |
| २) बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई ४. | २००–०० |
| ३) श्री. अनंतराव कुलकर्णी, पुणे २ | ५०–०० |
| ४) वेस्टर्न इंडिया व्हेजिटेबल प्रॉ. लि., जळगाव | २००–०० |
| ५) सौ. यमुनाबाई शेवडे, नागपूर | ५०–०० |
| ६) श्री. पंडित महाजन, मुंबई | १०–०० |
| ७) वेस्ट कोस्ट पेपर मिल्स लि., बंगलोर | २००–०० |
| ८) साराभाई केमिकल्स, बडोदा | ३००–०० |
| ९) इंडियन ह्यूम पाईप कं. प्रा. लि., मुंबई | ३००–०० |
| १०) म्हात्रे पेन ॲण्ड प्लास्टिक्स् इंडिया प्रा. लि. मुंबई | ३००–०० |
| ११) इंडोको रेमेडिज लि. | २००–०० |
| १२) हिंद रेझर ॲण्ड ब्लेडस् कं. लि. | ३००–०० |
| १३) हरक्युलीस व्हॉइस्टस् लि. | २००–०० |
| १४) नवनीत प्रकाशन लिमिटेड, मुंबई | २००–०० |
| १५) ऑटो सर्विस, गोवा | ३००–०० |
| १६) भुलाभाई ॲण्ड धिरजलाल देसाई मेमोरियल ट्रस्ट | ५०१–०० |
| १७) दीपावली मासिक, दलाल आर्ट स्टुडिओ, मुंबई ४ | २००–०० |
| १८) धि गोवा हिन्दू असोसिएशन, मुंबई ४ | ५०१–०० |
| १९) श्री. गोपाल नेवटिया, मुंबई | ५०१–०० |
| २०) श्री कमलसिंग सगीत० मेहफील | ५०१–०० |






आली. आम्ही सज्ज झालो व निघालो. शत्रूने आमची वाट अडविण्याची शिकस्त केली व १॥–२ तास त्याच्याशी माझ्या कंपनीची चांगलीच चकमक उडाली. पण शेवटी त्यांना हार घ्यावी लागली. कोंडी फोडून आम्ही एकदाचे आत घुसलो. वीस एक मिनिटातच जिथे विली मोर्च्यात बसलेला होता तिथे पोहोचलो. मला पाहताच त्याचा चेहरा आनंदाने फुलला व ""Thank God! You are here" म्हणत तो माझे स्वागत करायला उठून उभा राहिला. मी त्याच्याकडे हसत पाहून म्हणायला सुरवात केली. "Thank God, I have reached..." पण तेवढ्यात त्याच्या छातीवर जे त्याने Web equipment घातलेले होते त्यातील ग्रेंजेड ठेवायच्या खिशा (Pouch) कडे माझे लक्ष गेले, व मी जवळ जवळ ओरडलोच ""Willy, don't move".

अगदी नजीक पोचल्यावर शत्रूचा नाश करण्यासाठी ग्रेनेडचा उपयोग केला जातो. ही ग्रेनेड्स साधारण टेनिसच्या चेंडूयेवढी पण जरा निराळ्या आकाराची असतात. वरच्या अंगाला एक पिन असते, व ती ओढून काढून ग्रेनेड हातात धरून शत्रूवर फेकले की, फुटते एकाद्या बॉवप्रमाणे. जोपर्यंत वरची पिन काढली जात नाही, तो पर्यंत ग्रेनेडमधील स्फोटक द्रव्य पटवणारी कळ (Primer) खाली पडत नाही व स्फोट होत नाही. समरांगणात जाताना शिपाई जे 'खोगीर' (equipment) चढवतात त्याला दोन खिसे छातीला चिकटून बसणारे असतात ज्याच्यात ही ग्रेनेडस् ठेवण्यात येतात. म्हणजे वापरायच्यावेळी पट्‌कन खिशातून काढून, वरची पिन बाहेर ओढून क्षणाचाही विलंब न लावता ग्रेनेड शत्रूवर फेकता येते. जर का कशाच्याही धक्काने वरची पिन अचानक अगर अजाणतेपणी बाहेर निघाली तर ग्रेनेड आपोआप फुटते व आसपासच्या लोकांना जबर इजा–प्राणांतिकही–होणे शक्य असते.

## ग्रेनेडने कापलेला खिसा

मी पाहिले तेव्हा विलीच्या ग्रेनेडचा एक खिसा अगदी सुरीने कापल्यागत साफ कापलेला दिसला व आतील ग्रेनेडचे पण दोन भाग झालेले होते. जियून खिसा व ग्रेनेड कापले गेले होते तिथे काळसर डाग होता, आणि बंदुकीच्या गोळीने कापले गेले होते हे स्पष्ट होते. विलीने माझ्या नजरेचा रोख पाहून स्वतःच्या छातीकडे खाली नजर फिरविली, आणि परिस्थिती लक्षात येताच त्याचा चेहरा पांढराफट्ट पडला. कोणत्या क्षणी त्या ग्रेनेडचा स्फोट होईल याची खात्री नव्हती व ते ग्रेनेड तर त्याच्याच गळ्यात लटकावल्याप्रमाणे होते. म्हणजे स्फोट झाल्यास विलीच्या चिंधड्याच उडाल्या असत्या व त्याच्यापासून चारच पावलावर मी उभा असल्याने मलापण जबर दुखापत झाली असती.

"God, what do we do know" विली म्हणाला. मी म्हणालो. "हलू नकोस व त्या ग्रेनेडला पण हलू देऊ नकोस, हलकेच अंगावरचं equipment काढ व खाली ठेव, अन् मोर्च्याच्या (Trench) च्या बाहेर चढून ये. राग मानू नकोस पण मला मोर्च्याच्या बाहेर आधी पडू दे. मला दहा सेकंदांचा अवधि दे व मगच तू हालचाल कर" असे म्हणून मी त्या मोर्च्याच्या बाहेर पडलो व दहा-वीस पावलांवर जाऊन जमिनीवर पडूनच राहिलो. मला सपाटून घाम फुटला होता व मनातल्या मनात परमेश्वराचे नाव घेत मी तो पुशीत होतो. घड्याळाचा सेकंदाचा काटा अगदी लोखंडी पावलानीच पुढे सरकतो आहे असेच वाटले मला त्यावेळी, इकडे ब्रम्हांड आठवत होते, मनःचक्षुपुढून पत्नी व लहान मुले यांचे चित्र उमटत पुसत फिरत होते, घशाला कोरड पडली होती–दहा सेकंद–पंधरा—वीस—तीस— इतक्यात माझ्याजवळ धमकन् आवाज झाला. वळून पाहतो तो विली!! मला हुश्श झाले।

आवढा गिळून"You made it willie" मी म्हणतो तोच स्फोट झाला व आम्ही दोघानी डोळे मिटून घेतले, व काही वेळाने सामसूम झाल्यावरच ते उघडले ! बचावलो याची खात्री पटताच "विजयाचे कुंकू वळकट" हा माझ्या मनातील विचार जरा मोठ्या आवाजातच माझ्या तोडून बाहेर पडला. मराठी तितकेसे समजत नसल्याने विली मात्र माझ्याकडे पहातच राहिला.

[उत्तरार्ध जुलै १९६८ चे अंकांत]








GD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment MAY 1968



Cover Printed At Asha Printery, Bombay-4